


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक ३५४ ते ३५७

जानेवारी ते डिसेंबर २०१६

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

जानेवारी ते मार्च २०१६

## आदरांजली


मंगेश पाडगावकर


अरुण टिकेकर


आनंद विनायक जातेगावकर


डॉ. द. भि. कुलकर्णी

**अंतरंग**

विलास खोले
प्रभा गणोरकर
नीलिमा गुंडी
संजय भास्कर जोशी
बालाजी सुतार
देवानंद सोनटक्के
अरुण खोरे
शीला निपुणगे
मिलिंद परांजपे
सुजाता शेणई
स्वाती कर्वे
ऐश्वर्य पाटेकर

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३५४, जानेवारी-मार्च २०१६








**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३

संकेतस्थळ : www.masapapune.org

ई-मेल : masaparishad@gmail.com

(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका








त्यांच्या जाण्याने मराठी साहित्याची कधीच भरून न येणारी हानी झाली आहे. यातील काही साहित्यिकांच्या कार्यकर्तृत्वावर प्रकाश टाकणारे लेख या अंकात घेतले आहेत.

मंगेश पाडगावकर यांनी काव्याबरोबरच लघुनिबंध, व्यक्तिचित्रण, अनुवाद आदी प्रांतांतही समृद्ध मुशाफिरी केली. अफाट लोकप्रियता मिळालेल्या या कवीच्यां भाषाविषयक संवेदनांचा मार्मिक वेध घेणारा डॉ. नीलिमा गुंडी यांचा लेख या अंकात आहे. त्याचबरोबर मराठी समीक्षेच्या क्षेत्रातील एक महत्त्वाचे नाव म्हणजे डॉ. द. भि. कुलकर्णी. प्राचीन व अर्वाचीन अशा दोन्ही साहित्यपरंपरांचा व्यासंग असलेल्या दभिंच्या समीक्षाविचारांवर प्रकाश टाकणारा लेख प्रा. देवानंद सोनटक्के यांनी या अंकात लिहिला आहे.

आनंद विनायक जातेगावकर हे कथाकार-कादंबरीकार म्हणून परिचित असलेले नाव. बहुश्रुत आणि विदग्ध चिंतनशीलतेने संदर्भसमृद्ध असे त्यांचे लिखाण आहे. साहित्यिक कारकिर्दीच्या एका नव्या वळणावर हरपलेल्या या लेखकाच्या वाङ्मयीन योगदानावर भाष्य करणारा संजय भास्कर जोशी यांचा लेख या अंकात आहे. त्याचबरोबर पत्रकारिता आणि ग्रंथलेखन-संशोधन या प्रांतांत मौलिक योगदान दिलेल्या अरुण टिकेकर यांच्या व्यासंगाचा आणि कार्यकर्तृत्वाचा थोडक्यात वेध घेणारा अरुण खोरे यांचा लेखही याच अंकात वाचकांना वाचायला मिळेल.

मराठी साहित्यविश्वातले एक महत्त्वाचे समीक्षक व साक्षेपी संपादक अशी ओळख असलेल्या प्रा. रा. ग. जाधव यांना महाराष्ट्र शासनाच्या वतीने यंदाचा विंदा करंदीकर जीवनगौरव पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले. वर्तमानाचे रहस्य जाणून आपल्या वाङ्मयीन संस्कृतीविषयी लिहिणाऱ्या, बोलणाऱ्या दुर्मिळ संपादकांपैकी प्रा. रा. ग. जाधव एक आहेत. 'निळी पहाट', 'निळे पाणी' या ग्रंथांतून त्यांनी दलित साहित्याच्या समीक्षेचे महत्त्वाचे काम केले आहे. मराठी विश्वकोशाच्या संपादनात, तसेच महाराष्ट्र साहित्य परिषदेने प्रकाशित केलेल्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (१९५०-२०००)' या चार भागांत प्रकाशित करण्यात आलेल्या प्रकल्पाचे मुख्य संपादक म्हणून त्यांनी दिलेले योगदान अतिशय मोलाचे आहे. प्रा. जाधव यांना हा प्रतिष्ठेचा सन्मान मिळाला याचा विशेष आनंद वाटतो. या निमित्ताने प्रा. जाधव यांच्या व्यक्तिमत्त्वावर आणि वाङ्मयीन कामगिरीवर प्रकाश टाकणारा लेख त्यांचे जवळचे स्नेही डॉ. विलास खोले यांनी लिहिला आहे. त्याचबरोबर डॉ. खोले यांचा 'महर्षी धोंडो केशव कर्वे' हा चरित्रात्मक ग्रंथही अलीकडेच प्रकाशित झाला आहे. या ग्रंथातील एक संपादित अंश या अंकात प्रसिद्ध केला आहे.

बालिका ज्ञानदेव या तरुण आश्वासक कवयित्रीचा 'मॅगझिनीतून सुटतेय गोळी' हा कवितासंग्रह गेल्या वर्षभरात मराठी साहित्यविश्वात बराच चर्चिला गेला. प्रत्यक्ष पाहिलेले, अनुभवलेले विश्व तिने आपल्या कवितेतून मांडले आहे. अस्सल वास्तव मांडणाऱ्या तिच्या कवितेचा परामर्श घेणारा लेख प्रभा गणोरकर यांनी लिहिला आहे. त्याचबरोबर सुरेंद्र पाटील यांच्या अलीकडेच प्रकाशित झालेल्या 'झुलीच्या खाली' या वास्तवाला थेटपणे भिडणाऱ्या कादंबरीचे अंतरंग उलगडणारा बालाजी सुतार यांचा लेखही या अंकात वाचायला मिळेल. हे दोन्ही लेख वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

समकालीन महत्त्वाचे कवी ऐश्वर्य पाटेकर यांची 'जू' ही आत्मकथनात्मक कादंबरी अलीकडेच प्रकाशित झाली आहे. या कादंबरीच्या निमित्ताने लेखकाने व्यक्त केलेले मनोगत या अंकात प्रसिद्ध केले आहे. त्याचबरोबर डॉ. स्वाती कर्वे यांचा 'आठवणीतील पुस्तके' या पुस्तकाची निर्मितिप्रक्रिया उलगडणारा लेख, संत नामदेवांनी संतश्रेष्ठ ज्ञानदेवांच्या समाधिसोहळ्याचे केलेले चित्रण मांडणारा प्रा. शीला निपुणगे यांचा लेखही या अंकात वाचायला मिळेल. हे सर्वच लेख वाचकांना वेगळे भान देणारे आहेत.

कल्पक प्रकाशकांच्या विविध प्रकल्पांची ओळख करून देणाऱ्या 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरात सुजाता शेणई यांनी ज्योत्स्ना प्रकाशनच्या मिलिंद परांजपे यांच्याशी संवाद साधला आहे. गेल्या ६०-६५ वर्षांत केवळ बालसाहित्याची आणि चित्रकलेसंबंधीची दर्जेदार पुस्तके प्रकाशित करून ज्योत्स्ना प्रकाशनाने या क्षेत्रात आपला वेगळा ठसा उमटवला आहे. मराठी साहित्याचे दालन समृद्ध करणाऱ्या या प्रकाशनाची वाटचाल या संवादातून उलगडली आहे.

साहित्यविश्वातील अलीकडच्या काळातील महत्त्वाच्या घटना-घडामोडींची, ग्रंथांची नोंद घेणारा हा अंकही वाचकांना आवडेल अशी आशा आहे. आपल्या प्रतिसादाच्या अपेक्षेत.

पुन:श्च सर्वांचे आभार.

◆

**महेंद्र मुंजाळ**

**भ्रमणध्वनी :** ७७४४८२४६८५

mahendramunjal@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



निमित्ताने
विलास खोले



# रा. ग. जाधव समाजमनस्क समीक्षक

मराठी साहित्यविश्वातले एक महत्त्वाचे समीक्षक व साक्षेपी संपादक म्हणून प्रा. रा. ग. जाधव ओळखले जातात. साहित्य आणि समाज यांमधील संबंधांचे आकलन हा त्यांच्या समीक्षेचा अंगभूत भाग असल्याने एक समाजमनस्क समीक्षक अशी त्यांची ओळख बनली आहे. वर्तमानाचे रहस्य जाणून आपल्या वाङ्मयीन संस्कृतीविषयी लिहिणाऱ्या, बोलणाऱ्या दुर्मिळ समीक्षकांपैकी प्रा. जाधव एक आहेत. 'साहित्य हाच धर्म' असे मानणाऱ्या प्रा. जाधव यांना महाराष्ट्र शासनाच्या वतीने यंदाचा प्रतिष्ठेचा विंदा करंदीकर जीवनगौरव पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले. या निमित्ताने प्रा. जाधव यांच्या व्यक्तिमत्त्वावर व वाङ्मयीन योगदानावर प्रकाश टाकणारा त्यांच्या निकटच्या स्नेह्याचा हा लेख.



२७ फेब्रुवारी २०१६ या मराठी भाषादिनी प्राध्यापक रा. ग. जाधव यांना महाराष्ट्र शासनाच्या वतीने पाच लाखांचा विंदा करंदीकर जीवनगौरव पुरस्कार देऊन त्यांच्या आजवरच्या कार्याचा सन्मान करण्यात आला. या घटनेने महाराष्ट्रातील सर्वच जाणकारांना आनंद झाला. खरे म्हणजे वयाच्या चौऱ्याऐंशीव्या वर्षीपर्यंत महाराष्ट्र शासनाने थांबायला नको होते आणि याआधीच हा पुरस्कार प्रा. जाधव यांना मिळायला हवा होता, अशीच भावना जवळपास सर्वांच्या मनात होती; परंतु 'बेटर लेट दॅन नेव्हर' या इंग्लिश उक्तीप्रमाणे उशिरा का होईना, योग्य व्यक्तीची निवड या पुरस्कारासाठी झाली. दलित साहित्याचे पहिले व्यवस्थापनकार, समकालीन साहित्यकृतींना व साहित्यिकांना सुप्रतिष्ठित करणारे टीकाकार आणि आत्मप्रत्ययाची/आत्मप्रामाण्याची प्रतिष्ठा वाढविणारे समीक्षक असणाऱ्या जाधव यांचा गौरव आयुष्याच्या उत्तरार्धात वेगवेगळ्या पुरस्कारांनी झाला. यशवंतराव चव्हाण पुरस्कार, प्रियदर्शनी पुरस्कार, युगांतर प्रतिष्ठान पुरस्कार, महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार, या सगळ्यांवर कळस चढविला तो आता लाभलेल्या गौरवशाली अशा विंदा करंदीकर जीवनगौरव पुरस्काराने. त्यांच्या कार्याची महाराष्ट्राने दिलेली ही पावती म्हणता येईल.

मराठी साहित्यविश्वात रा. ग. (रावसाहेब गणपतराव) जाधव (जन्म २४ ऑगस्ट १९३२) हे नाव समीक्षाक्षेत्राशी कायमचे जोडले गेले आहे. या क्षेत्रातील त्यांची तपश्चर्या शालेय जीवनातच सुरू झाली. मॅट्रिक होण्यापूर्वीच ते महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या 'साहित्य प्राज्ञ' व 'साहित्य विशारद' या परीक्षा उत्तीर्ण झाले होते. प्राज्ञ व विशारद या अभ्यासक्रमांतील भारतीय साहित्यशास्त्र व टीकाशास्त्र या दोन्ही विषयांशी त्यांचा परिचय सोळाव्या-सतराव्या वर्षीच उत्तम प्रकारे झाला होता. त्यांचे पुढले शिक्षण संगमनेरमध्ये एस. टी.मधली नोकरी करत झाले असले तरी त्या निमित्ताने ते नाशिकमधल्या साहित्यविश्वात रमले. कुसुमाग्रज, अ. वा. वर्टी, वि. बा. आंबेकर, बाळासाहेब

दातार, दत्ता सराफ या तत्कालीन नामवंत साहित्यिकांशी त्यांचे जवळचे संबंध आले. दि. के. बेडेकरांशी जाधव यांचा परिचय याच काळात झाला. दादासाहेब पोतनीस यांच्या 'गावकरी' साप्ताहिकात काम करण्याची संधी त्यांना लाभली. 'साहित्यातील सुधा आणि काकवी' नावाचे सदर त्यांनी 'गावकरी'मधून चालवले. त्यांनी केलेले 'मालतीमाधव' या नाटकाचे भाषांतर 'गावकरी'मधून सचित्र स्वरूपात प्रसिद्ध झाले. त्यांची आई नित्य म्हणत असलेल्या 'व्यंकटेशस्तोत्रा'चे सुंदर रसग्रहणही त्यांनी 'गावकरी'च्या रविवारच्या अंकातून प्रसिद्ध केले. त्यांच्यामधल्या साहित्यिक-समीक्षकाची आरंभकालीन जडणघडण 'गावकरी'ने केली.

चार वेगवेगळ्या नद्यांकाठी रा. ग. जाधव यांच्या आयुष्यातील सुखदु:खांना वेगवेगळी वळणे लागली आहेत. त्यांचा जन्म बडोदा येथे 'विश्वामित्रीच्या' काठी झाला, त्यांचे बालपण व शालेय शिक्षण मुळामुठेच्या तीरी झाले, त्यांच्या जीवनाला आकार नाशिक येथे गोदावरीकाठी लाभला, कृष्णेकाठी वाईला विश्वकोशात त्यांची प्रदीर्घ सेवा झाली आणि आयुष्याची संध्याकाळ ते पुन्हा पुण्याला मुठेच्या काठी व्यतीत करताहेत. कायम निवासासाठी जाधव पुण्याला आले आणि त्यांच्या आयुष्यातला उत्कर्षकाल सुरू झाला. वेगवेगळी विद्यापीठे, महाविद्यालये, संस्था यांनी आयोजित केलेल्या चर्चासत्रांतील त्यांची उपस्थिती हळूहळू अनिवार्य ठरत गेली. त्या निमित्ताने मुंबई, गोवा, नागपूर, अमरावती, औरंगाबाद यांसारख्या ठिकाणी त्यांचा प्रवास घडला. ठिकठिकाणच्या माणसांशी विश्वकोशात असतानापासूनच निर्माण झालेला स्नेहभाव अधिक प्रमाणात वृद्धिंगत होत गेला. जनमानसातला त्यांच्याविषयीचा आदर वाढीला लागला. औरंगाबाद येथे झालेल्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची अविरोध झालेली निवड हा त्यांच्याविषयी अखिल मराठी भाषकांच्या मनात असणाऱ्या सद्भावाचा व सौहार्दाचा आविष्कार होता.

समीक्षेच्या व संपादनाच्या क्षेत्रात महत्त्वपूर्ण कामगिरी बजावलेल्या रा. ग. जाधव यांनी आपल्या लेखनकर्तृत्वाचा कधीही गाजावाजा केला नाही. अल्पशा गौरवानेही चटकन संकोचून जाण्याचा त्यांचा स्वभाव आहे. चहा हे त्यांचे आवडते पेय. एका वेळी चहाचा अर्धा कप पीत गप्पा मारण्याने ते आनंदी होतात. त्यांचा मित्रपरिवार मोठा असला आणि त्यांचा चाहतावर्ग विपुल असला तरी सर्वांपासून अलिप्त राहण्याची त्यांची वृत्ती त्यांच्यातील आंतरिक उदासीनतेचा प्रत्यय आणून देणारी आहे. कोणाकडून काही करून घेणे त्यांना कधीच मानवले नाही. अर्थात अंगी एक प्रकारचा वैराग्यभाव असला तरी जाधव यांचे राहणे व्यवस्थित असते. पँटमध्ये खोचलेला शर्ट, थंडीच्या दिवसांत त्यावर घातलेले स्वेटर हा त्यांचा नेहमीचा वेष. हसतमुख व प्रसन्न चेहरा आणि स्वागतशील बोलणे यांमुळे त्यांना भेटणाऱ्या प्रत्येकालाच आपण यांच्या जवळचे आहोत असे वाटत राहते. वस्तुत: जाधव कोणाचेच नसतात. त्यांच्या जुन्या-नव्या, वयस्क-तरुण मित्रांना हा अनुभव अनेकवार आला आहे.

१९५८ मध्ये जाधव मराठीचे अध्यापन करू लागले. विदर्भ महाविद्यालय, एल्फिन्स्टन महाविद्यालय आणि मिलिंद महाविद्यालय या ठिकाणी मिळून जवळपास एक तपाचा काळ त्यांनी मराठीचे अध्यापन केले. अमरावतीला असताना रा. भा. पाटणकर, के. ज. पुरोहित, दि. य. देशपांडे, नातूबाई यांसारख्या प्राध्यापकांचा सहवास त्यांना लाभला. जेव्हा ते एल्फिन्स्टनमध्ये आले तेव्हा म. अ. करंदीकर, म. वा. धोंड, सरोजिनी शेंडे हे त्यांचे सहकारी होते. इंग्लिश भाषा, इंग्लिश साहित्य, इंग्लिशमधील आधुनिक समीक्षाविचार सतत त्यांच्या कानांवर पडत होता. मिलिंद महाविद्यालयात गेल्यानंतर अगदीच वेगळ्या जीवनाशी त्यांचा परिचय घडला. ज्या दलित साहित्यसमीक्षेमुळे ते समीक्षावर्तुळात ओळखले जाऊ लागले ते दलित साहित्य, त्या दलित जीवनजाणिवा आणि दलितांची आंदोलने औरंगाबादमध्ये अगदी जवळून त्यांनी अनुभवली. त्यामुळेच 'दलित कलेचा आकृतिबंध' ते रेखाटू शकले. दलित साहित्यामागील समूहाची वेदना त्यांच्या समीक्षेत उमटली आहे. 'निळी पहाट' आणि 'निळे पाणी' हा या अनुभवाचा परिपाक होता. त्यांची दलित साहित्याची मीमांसा व इतरही समीक्षालेखन याच काळात आकाराला आले. दलित साहित्याला आवश्यक असणारा प्रभावी समीक्षक आणि दलित समाजाची भाषा व भावना जाणणारा तसेच त्यांच्याशी मन:पूर्वक समरस होणारा आणि तरीही ताटस्थ्यपूर्वक साहित्याची व कलेची सखोल मीमांसा करणारा टीकाकारच दलित साहित्याचे उत्तम संवर्धन करू शकेल हे त्यांनी आपल्या लेखनातून सिद्ध केले. त्यांनी केलेली दलित साहित्याची समीक्षा स्वागतशील वृत्तीने केलेली असली तरी तिचे स्वरूप केवळ भावनात्मक पातळीवरचे नाही. ती समीक्षा व्रतस्थ अध्ययनशीलतेने या निर्मितीमागील जीवनानुभवांचे सामाजिक-सांस्कृतिक स्वरूपाचे विश्लेषण करणारी आहे. इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान, समाजकारण इत्यादी संस्कृतिसंबद्ध घटकांचे निर्मितीवर होणारे परिणाम ही समीक्षा तपासते. सांस्कृतिक जडणघडणीतील चढउतारांचा साहित्यकृतीच्या अस्तित्वरूपाशी असणारा संबंध ती लक्षात घेते आणि केवळ दलितांच्या दु:खापुरते सीमित न राहता साहित्यपरंपरेतील एका समर्थ चळवळीची स्थाननिश्चिती करते.

१९७० मध्ये तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे सहकारी



अनुक्रमणिका

व मराठी विश्वकोशाच्या मानव्य विद्याशाखेचे प्रमुख संपादक या नात्याने वाईच्या विश्वकोश कार्यालयात त्यांनी प्रवेश केला, आणि १९९० पर्यंत वीस वर्षे ते वाईला राहिले. कालांतराने विश्वकोश निर्मिती मंडळाचे अध्यक्षपदही त्यांनी काही काळ सांभाळले. जाधव यांच्या सेवाकालाचा विश्वकोशाला आणि विश्वकोशातील कामाचा जाधव यांना अतिशय उपयोग झाला. त्यांच्या कार्यशक्ती येथे फुलून आल्या आणि त्यांच्यातील साक्षेप व चिकाटी या गुणांचा विकासही येथे घडला. त्यांचे समीक्षालेखन बहरले. अर्नाळकरांच्या रहस्यकथेपासून अमिताभच्या अभिनयापर्यंत आणि साहित्याच्या सामाजिक बांधिलकीपासून तेंडुलकर-आळेकरांच्या नाट्यलेखनापर्यंत त्यांच्या समीक्षेने अप्रतिहत संचार केला. समकालीन साहित्यकृती व साहित्यविचार त्यांच्या समीक्षालेखनामागील महत्त्वाची प्रेरणा होती. समीक्षकापाशी असाव्या लागणाऱ्या प्रतिभेचे सुरम्य विलसित त्यांच्या समीक्षेतून दृष्टीस पडते. साहित्य, समाज व संस्कृती यांविषयीच्या सातत्यपूर्ण चिंतनाने त्यांच्या समीक्षेला सौंदर्य व सामर्थ्य या दोहोंची प्राप्ती घडली. 'साहित्याला एक मानव्यमूल्य असते. साहित्याचे मानव्यमूल्य जपणे याचा अर्थ समाजातच माणसाच्या केवळ माणूस म्हणून संभवणाऱ्या मूल्याचे संवर्धन करणे, या मूल्याचा संदर्भ सतत जागृत राखणे आणि त्यामुळेच साहित्याच्या आशयद्रव्याची, रंगरूपांची, अर्थपूर्णतेची, मूल्यांचा संगती लावून देणारे समग्रलक्ष्यी चिंतन म्हणजे समीक्षा,' अशी समीक्षेविषयीची त्यांची धारणा त्यांच्या लेखनामधून वेळोवेळी प्रकटली आहे.



**समकालीन साहित्यकृती व साहित्यविचार त्यांच्या समीक्षालेखनामागील महत्त्वाची प्रेरणा होती. समीक्षकापाशी असाव्या लागणाऱ्या प्रतिभेचे सुरम्य विलसित त्यांच्या समीक्षेतून दृष्टीस पडते. साहित्य, समाज व संस्कृती यांविषयीच्या सातत्यपूर्ण चिंतनाने त्यांच्या समीक्षेला सौंदर्य व सामर्थ्य या दोहोंची प्राप्ती घडली.**

कविता, कथा, नाटक या साहित्यरूपांचा सूक्ष्म वेध त्यांनी आपल्या समीक्षेमधून घेतला आहे. कवितेविषयीचा अत्युत्कट प्रेमभाव हे समीक्षक जाधव यांच्या व्यक्तिमत्त्वाचे एक प्रमुख वैशिष्ट्य आहे. त्यांच्या व्यक्तित्वाला व्यापून राहिलेले कवित्व त्यांच्या समीक्षालेखनाच्या भाषेवरून ध्यानात येते. 'कविता आणि रसिकता' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत कवितेला त्यांनी सहधर्मचारिणीची पदवीच बहाल केली आहे. कवितेची सोबत ही त्यांची आंतरिक गरजच म्हणता येईल. 'कविता आणि रसिकता', 'साठोत्तरी मराठी कविता व कवी' आणि 'आधुनिक मराठी कवयित्रींची कविता' यांमधून त्यांची काव्यसमीक्षा वाचावयास मिळते. साठोत्तरी कवितेविषयी लिहिताना या कवितेने उपस्थित केलेले किंवा सूचित केलेले प्रश्नोपप्रश्न अनेकमुखी स्वरूपाचे आहेत हे त्यांनी ओळखले. दिलीप चित्रे, अरुण कोलटकर, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, ग्रेस यांसारख्या १९६० नंतरची मराठी कविता संपन्न करणाऱ्या प्रतिभावंत कवींच्या काव्यविश्वाचा वेध रा. ग. जाधव यांनी समरसून घेतला आहे. 'विश्लेषक रीतीने व संश्लेषक दृष्टीने' या निर्मितीचा अभ्यास केल्याखेरीज साठोत्तरी कवितेची संपन्नता समजणे अवघड आहे हे त्यांनी सुस्पष्ट केले. साठोत्तरी मराठी कवितेबद्दल त्यांनी केलेले भाष्य अतिशय अर्थपूर्ण आहे. ही कविता म्हणजे विसाव्या 'शतकाच्या सांध्यपर्वातील सुखदु:खाची विलक्षण भावपूर्ण आत्मकथाही आहे. मानव्याची, कलांची, संस्कृतीची खरी आत्मकथा अशीच असते.' सौजन्यशीलता हा ज्याप्रमाणे जाधव यांचा व्यक्तिविशेष आहे तसाच तो त्यांच्या समीक्षेचाही धर्म आहे. मराठीतील कवयित्रींचा मार्मिक परामर्श घेताना त्यांनी अगत्यपूर्वक 'स्त्रीकाव्यातील घराचा आदिबंध' उलगडून दाखविला आहे. व्यक्तिजीवनातील व समाजजीवनातील जीवनानुभवांचे बहुतेक पदर घर या संकल्पनेशी येऊन मिळतात याची जाणीव त्यांनी करून दिली आहे. जाधवांच्या समीक्षादृष्टीचे वेगळेपण सांगायचे तर मराठी साहित्यविश्वात ज्या काळात वास्तववादी निर्मितीचे विशेष कौतुक केले जात होते त्या काळात त्यांनी कल्पनाशक्तीचे महत्त्व व कार्य आवर्जून प्रतिपादन केले. वास्तवाचे साकल्यात्मक मर्म आविष्कृत करण्यासाठी कल्पनाशक्तीचे वैभव असावे लागते, त्यावाचून साहित्यकृतीला महत्ता लाभत नाही, ही आपली भूमिका त्यांनी सप्रमाण मांडली आहे.

'डोहकाळिम्यात डोकावताना' हे त्यांचे लेखन जी. ए. कुलकर्णी यांच्या कथासाहित्याचा स्वतंत्र अन्वयार्थ सांगणारे आहे. 'मराठीतील कथारूपे' आणि 'निळे पाणी' हे त्यांचे लेखसंग्रह केवळ कथासमीक्षेस वाहिलेले आहेत. मराठीतील कुटुंबकथांच्या अपयशाची कारणमीमांसा केल्यानंतर 'आधुनिक मनाची गोष्टीविषयीची आस्था कमी झालेली नसली तरी त्यातील नाट्याविषयीची आस्था मात्र क्षीण झालेली आहे,' असे अत्यंत मार्मिक विधान जाधवांनी केले



अनुक्रमणिका



आहे. 'जीवनाच्या कल्पिताची जाणीव ही एकाच वेळी त्याच्या कथात्म रूपाची आशयदाती व घाटदायिनी असते' असा कथारूपाविषयीचा उलगडा त्यांनी केला आहे. आत्मप्रत्यय प्रमाण मानणाऱ्या या समीक्षकाने 'घार', 'मुक्ती', 'विघ्नहर्ती', 'तलावातले चांदणे', 'भुजंग', 'सूड', 'विदूषक', 'तळपट', 'नागीण' या मराठीतील वेचक कथांची आस्वादपर रसग्रहणे लिहून कथांच्या अंतरंगसौंदर्यावर प्रकाश टाकला आहे. जाधव यांच्या कथाविषयक मौलिक विवेचनाकडे अभ्यासकांचे फारसे लक्ष गेलेले नाही. कथासमीक्षेप्रमाणेच त्यांच्या नाट्यसमीक्षेचीही कहाणी आहे. 'आगळीवेगळी नाट्यरूपे' हा त्यांचा लेखसंग्रह मर्ढेकरांच्या 'नटश्रेष्ठ व चार संगीतिका', 'श्रीमंत', 'एक शून्य बाजीराव', 'सखाराम बाइंडर', 'महानिर्वाण', 'वासनाकांड' या महत्त्वपूर्ण नाट्यकृतींची समीक्षा सादर करतो. या वेगवेगळ्या नाट्यरूपांची सूक्ष्म चिकित्सा करून त्यांनी आपला प्रतीतिबोध संबंधित लेखांत शब्दबद्ध केला आहे. या वैशिष्ट्यपूर्ण व व्यामिश्र नाट्यरूपांचा त्यांनी घेतलेला मर्मग्राही वेध आणि 'व्यस्ततावादी मराठी रंगभूमी'चे त्यांनी स्पष्ट केलेले स्वरूप यांमधून समीक्षक जाधव यांच्या सूक्ष्म चिकित्साशैलीचा परिचय घडतो. विश्लेषण, संश्लेषण आणि ॲब्स्ट्रॅक्शन या त्रिविध शक्तींनी युक्त अशी त्यांची सैद्धान्तिक व उपयोजित समीक्षा अभ्यासकांना नवी दृष्टी देणारी आहे.

'विनोदाचे गर्भघाट' हा जाधव यांचा निबंध विनोदाच्या स्वरूपाची मूलभूत मांडणी करणारा आहे. 'चांगला विनोद हा चांगल्या कवितेचा व चांगल्या नाटकाचा सहचर असतोच असे नाही. बिघडलेल्या विनोदाला चांगल्या काव्यकथादी घाटाने चांगुलपणा प्राप्त होत नाही आणि बिघडलेल्या घाटामुळे चांगल्या विनोदाला कनिष्ठपणाही येत नाही.... शुद्ध विनोद हा वचनपर वा वर्णनपर स्वरूपाचा व त्रोटक असतो. जीवनाची, मानवी स्वभावाची काही अंगोपांगे त्यातून उजळलेली असतात, पण त्याचा मूलभूत स्वरूपाचा त्रोटकपणा हा अशा जीवनदर्शनात स्वाभाविकपणे त्रोटकपणा निर्माण करतो. त्यातून जीवनाचे संश्लिष्ट, सखोल व एकात्म असे दर्शन घडत नाही.' विनोदाची ही मर्यादा मराठी समीक्षेत केवळ जाधव यांनीच नेमकेपणाने सांगितली आहे. गंभीर साहित्याबरोबरच लोकप्रिय साहित्याचीही मीमांसा करून जाधव यांनी साहित्यातील व समीक्षेतील विविध प्रवृत्तींचे सामर्थ्य अधोरेखित केले आहे.

'पर्यावरणीय प्रबोधन आणि साहित्य' हे जाधव यांचे पुस्तक 'साहित्याचे परिस्थितिविज्ञान' (इकॉलॉजी ऑफ लिटरेचर) हे सर्वस्वी स्वतंत्र सिद्धांतन मांडणारे पुस्तक आहे. त्यांच्याच भाषेत सांगायचे, तर साहित्याचे परिस्थितिविज्ञान ही एक रूपकात्मक संकल्पना आहे. साहित्यविचार हादेखील परिस्थितिविज्ञानाप्रमाणेच एक वैशिष्ट्यपूर्ण विचार आहे. जीवविज्ञान व जडविज्ञान यांची एक समवाय दृष्टी परिस्थितिविज्ञानामागे आहे. ती बौद्धिक व भौतिक अशा दुहेरी सांस्कृतिक गरजेतून उदयास आली आहे. पशुपक्षी, वनस्पती, कृमी-कीटकादी सूक्ष्म तसेच स्थूल सजीव इत्यादींचा नैसर्गिक पर्यावरणाशी असणारा संबंध अनेक प्रकारचा असतो. या गुंतागुंतीच्या परस्परसंबंधांचा शास्त्रीय दृष्टीने करण्यात येणारा समग्र व सर्वांगीण अभ्यास म्हणजे परिस्थितिविज्ञान. जाधव यांचा हा सिद्धांत रूढ साहित्यविचारातील व्यक्तिगतता, अस्पष्ट सामाजिकता व पोकळ सांस्कृतिकता यांचा निरास करू शकेल असे त्यांना वाटते. दुर्दैवाने त्यांच्या या सिद्धांतनाकडेही मराठी समीक्षेने जेवढे लक्ष द्यावे तेवढे दिले नाही.

महाराष्ट्र साहित्य परिषद या संस्थेशी शालेय जीवनात निर्माण झालेले निकटचे नाते वयाच्या पंचाहत्तरीनंतरही कायम राहिले. गं. ना. जोगळेकर व वि. भा. देशपांडे यांच्या आग्रहामुळे त्यांच्या हातून मराठी वाङ्मयाची अतिशय महत्त्वाची सेवा पार पडली. मराठी वाङ्मयाच्या इतिहासाच्या सातव्या खंडाचे चार भाग अक्षरशः कष्टपूर्वक संपादित करून त्यांनी १९५० ते २००० या पन्नास वर्षांतील मराठी वाङ्मयाचा इतिहास सिद्ध केला. १९५० नंतरच्या काळात मराठी साहित्यात नवनवे साहित्यप्रकार आणि वेगवेगळ्या वाङ्मयीन वृत्तिप्रवृत्ती उदयाला आल्या. त्यांची चिकित्सापूर्वक नोंद करणे वाङ्मयेतिहासाचे महत्त्वाचे कार्य होते. या दृष्टीने चारही भागांतील लेखकांशी व्यक्तिगत पातळीवर विचारविनिमय करून, तसेच त्यांचे साकल्याने वेध घेणारे लेखन बारकाईने वाचून, तपासून, दुरुस्त करून त्यांनी हे चार भाग तयार केले. वाङ्मयेतिहासाच्या पहिल्या सहा खंडांपेक्षा सातव्या खंडाचे व चार भागांचे काम अतिशय अवघड होते. पन्नास वर्षांच्या कालावधीत देशातील सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, आर्थिक क्षेत्रांत अनेकानेक स्थित्यंतरे घडली होती. या सर्व स्थित्यंतरांचे साहित्यनिर्मितीशी निकटचे नाते होते. पालटत्या परिस्थितीचे भान ठेवून प्रत्येक साहित्यप्रकारात झालेल्या निर्मितीचे आकलन-अवलोकन करणे नितांत गरजेचे होते. सातव्या खंडाचे संपादन करताना जाधव यांनी हे भान कायम ठेवले. लोकप्रिय साहित्य, स्त्रीवादी साहित्य, वाङ्मयीन नियतकालिके अशांसारखे नवनवे विषय त्यांनी या खंडात सामावून घेतले आणि वाङ्मयेतिहासास परिपूर्णता आणण्याचा प्रयत्न केला. 'साधना' साप्ताहिकाच्या हीरक महोत्सवाच्या निमित्ताने त्यांनी निवडक लेखांचे आठ खंड संपादित केले. साने गुरुजींच्या समग्र साहित्याचे संपादनही त्यांनी साक्षेपाने व आत्मीयतेने केले. विश्वकोशात त्यांनी कमावलेल्या कार्यशक्तीचा वरील प्रकल्पांतून दृष्टीस पडणारा

आविष्कार अतिशय भरघोस आहे. समीक्षक म्हणून आणि संपादक म्हणून त्यांनी बजावलेली कामगिरी ऐतिहासिक महत्त्वाची आहे.

हे सगळे खरे असले तरी रा. ग. जाधव यांचा मूळ पिंड हळुवार, भावनाशील, चिंतनशील कवीचा आहे. 'वियोगब्रह्म' (१९९५) आणि 'मावळतीच्या कविता' (१९९७) हे त्यांचे काव्यसंग्रह त्यांच्या कविप्रकृतीचे मनोहारी दर्शन घडविणारे आहेत. २०१२ मध्ये 'बापू : एक भाषित चिंतनकाव्य' ही 'साधना' प्रकाशनच्या वतीने प्रसिद्ध झालेली त्यांची दीर्घ कविता त्यांच्यातील सामाजिक जाणीव आणि गांधींविषयीचा आदरभाव यांची प्रभावी अभिव्यक्ती आहे. आज गांधीजी नाहीत, त्यांचा 'आतला आवाज' नाही. आज भारतात सत्याने जगता येत नाही. सत्याग्रह आणि उपोषणे यांची शुद्धता उरलेली नाही. देश नखशिखान्त किडला आहे. 'महात्मा गांधी की जय' ही घोषणा गेल्या साठ वर्षांत ऐकू आलेली नाही. आज झालेली नैतिक मूल्यांची पायमल्ली, लोकशाहीची झालेली अधोगती, भ्रष्टाचाराची आणि अनाचाराची सबंध देशाला लागलेली कीड आणि या सर्व परिस्थितीबद्दल शासनाच्या पातळीवर व संवेदनाशून्य लोकमनावर तिळमात्रही न उमटणारी खंत यामुळे कमालीचे बेचैन झालेले कविमन काय चांगले आणि काय वाईट, काय खरे आणि काय खोटे, काय कल्पित आणि काय वास्तव अशा भ्रमजालात अडकले आहे. नरेंद्र दाभोलकर यांच्या खुनामुळे रा. ग. जाधव यांच्या कविहृदयात जी कालवाकालव निर्माण झाली ती 'हे मित्रवर्या' या संग्रहातील कवितांतून त्यांनी शब्दांकित केली आहे. दाभोलकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेकानेक पैलू रा. ग. जाधव यांनी चित्रकाराच्या कौशल्याने ब्रशाच्या एकेका फटकाऱ्याने उभे केले आहेत. त्यांचा प्रभाव, त्यांचे अजातशत्रुत्व, कामाविषयीची त्यांची बांधिलकी, अथक परिश्रमशीलता, कार्यतत्परता, नियोजनचातुर्य, सार्वत्रिक मित्रभाव, माणसाची पारख करण्याची त्यांची क्षमता, त्यांचे मार्मिक व मुद्देसूद बोलणे, त्यांची विचक्षण अंत:प्रेरणा, समयज्ञता, त्यांचा आत्ममग्न पण निर्विकार चेहरा, आत्मविलोपनाचे त्यांचे अध्यात्म, त्यांची प्रवोधनप्रचुरता, त्यांचा विवेक व बुद्धिप्रामाण्यवाद, त्यांचे अबोल सौहार्द इत्यादी. डॉक्टरांच्या अकाली जाण्याने कवीला भडभडून येते. डॉक्टरांचे विचार 'त्यांच्यावर गोळी झाडणाऱ्या व्यक्तीपर्यंत पोहोचविण्यात आम्ही कमी पडलो की काय?' असा प्रश्न कवीला पडला आहे. आयुष्यभर समीक्षालेखन करत असताना जाधव यांच्यातील कवी सदैव जागा होता याची जाणीव करून देणारी कविता अत्यंत विमनस्क अवस्थेत त्यांनी लिहिली.

**रा. ग. जाधव यांचा मूळ पिंड हळुवार, भावनाशील, चिंतनशील कवीचा आहे. 'वियोगब्रह्म' आणि 'मावळतीच्या कविता' हे त्यांचे काव्यसंग्रह त्यांच्या कविप्रकृतीचे मनोहारी दर्शन घडविणारे आहेत. २०१२ मध्ये 'बापू : एक भाषित चिंतनकाव्य' ही 'साधना' प्रकाशनच्या वतीने प्रसिद्ध झालेली त्यांची दीर्घ कविता त्यांच्यातील सामाजिक जाणीव आणि गांधींविषयीचा आदरभाव यांची प्रभावी अभिव्यक्ती आहे.**

आता मात्र रा. ग. जाधव यांची लेखणी थबकली आहे. 'साहित्य हाच धर्म' असे मानणारे जाधव आता मूक झाले आहेत. अत्यंत निरिच्छ आणि शांत असे जीवन ते व्यतीत करताहेत. हल्ली तर त्यांचे नेत्र पैलतीरी लागले आहेत. कादंबरी लिहिण्याचा त्यांचा संकल्प विरून गेला आहे. अन्य लेखनोर्मीही मावळल्या आहेत. लौकिक सुखाची कुठलीही आकांक्षा त्यांना उरलेली नाही. त्यामुळेच विंदा करंदीकर जीवनगौरव पुरस्काराने त्यांच्यापेक्षा त्यांच्या निकटवर्तीयांनाच आनंद झाला आहे. आठ-दहा वर्षांपूर्वी हेच घडते तर त्यांचा जीवनगौरव दिमाखाने साजरा करता आला असता. परंतु या पुरस्काराने त्यांच्या आयुष्यभराच्या कामगिरीची अधिकृत दखल घेतली गेली आहे यावरच समाधान मानणे भाग आहे.

●

डॉ. विलास खोले
दूरध्वनी : ०२०-२५२३ ४६४२

**मन:पूर्वक अभिनंदन!**

**महाराष्ट्र शासनाच्या वतीने प्रकाशन क्षेत्रातील दीर्घकाळ योगदानासाठी दिला जाणारा श्री. पु. भागवत पुरस्कार यंदा 'कॉन्टिनेन्टल प्रकाशना'ला प्रदान करण्यात आला. त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन!**



अनुक्रमणिका








# 'झुलीच्या खाल'च्या जखमांचे दर्शन

■ ■

**सुरेंद्र पाटील यांची 'झुलीच्या खाली' ही वास्तवाला थेटपणे भिडणारी लक्षणीय कादंबरी मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊसतर्फे अलीकडेच प्रकाशित झाली आहे. या कादंबरीचे अंतरंग उलगडणारा कवी-कथाकार बालाजी सुतार यांचा लेख.**

■ ■

पोळ्याच्या दिवशी बैलांच्या पाठीवर झूल चढवली जाते. वर्षभर राबणाऱ्या बैलाबद्दल कृतज्ञता दाखवण्याचा हा सकृद्दर्शनी प्रकार असतो. झुलीमुळे बैल शोभिवंत दिसतात, हे बघायला केवढं तरी छान वाटतं. पण जरासं खोलात गेलो तर लक्षात असं येतं की झुलीचे आणखीही काही उपयोग असतात. उदाहरणार्थ, वर्षभर बैलाने केलेल्या काबाडकष्टांचे आणि ते कष्ट त्याने निमूटपणे सहन करावेत यासाठी त्याला केल्या गेलेल्या मारझोडीचे वळ झुलीमुळे झाकले जातात. दुसऱ्या दिवशी झूल उतरते तेव्हा हे वळ ढळढळीतपणे दिसून येतात. 'झुलीच्या खाली' ही असले वळ दाखवणारी कादंबरी आहे.

श्रीशैल्य गुरुनाथ बिराजदार या शिक्षकाच्या डायरीतून ही कादंबरी उलगडत जाते, तेव्हा ती कृषिव्यवस्थेतल्या, शिक्षणव्यवस्थेतल्या आणि ग्रामीण भागातल्या कुटुंबव्यवस्थेतल्या अनेकपदरी विदारकतेचं जिवंत प्रत्ययदायी दर्शन घडवत जाते.

घरा-वावरात झोंबी घेत कुणब्यांची पोरं शिक्षण घेत असतात. एकीकडे 'शेती' नावाच्या पारंपरिक जीवनशैलीतले भोग भोगत असतानाच नव्या, वेगळ्या, अधिक सुखी जीवनाची दारं शिक्षणाने आपल्यासाठी उघडली जाऊ शकतात, अशा समजुतीने या दोन अत्यंत भिन्न आणि दूरस्थ ध्रुवांवर दोन पावलं ठेवून, तोल सांभाळून उभं राहायचा प्रयत्न करत असतात. शिक्षण संपल्यावर ग्रामीण भागात त्यातल्या त्यात सहजपणे मिळू शकेल अशी एकच व्यवस्था उपलब्ध आहे. शिक्षणाच्या खासगीकरणाने गावगन्ना उघडून ठेवलेल्या कथित शिक्षणमहर्षी पुढाऱ्यांच्या शिक्षणसंस्था. केवळ दारिद्र्याचाच वारसा देणाऱ्या घरातल्या, शेतातल्या कामांचा धबडगा सांभाळून घेता येण्यासारखं शिक्षणही एकाच प्रकारचं असतं. बी. ए. किंवा एम.ए. होणं आणि नंतर डी.एड. किंवा बी.एड करणं. हे झाल्यानंतर कुठे तरी शिक्षक म्हणून 'चिकटण्या'साठी प्रयत्न करणं आणि भरमसाट डोनेशन देऊन एकदाचं चिकटून जाणं हेही ओघानेच येतं. आणि असं चिकटून गेलं की मग काही वेगळे संघर्ष, वेगळे ताण, वेगळ्या कसरती चालू होतात. 'झुलीच्या खाली' ही अशा संघर्षात्मक कसरतींची कथा आहे.



झुलीच्या खाली
सुरेंद्र पाटील
मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस
पृष्ठे : ११६
मूल्य : १२० रुपये

सुरेंद्र पाटील यांनी लिहिलेल्या आणि मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊसने प्रकाशित केलेल्या या कादंबरीच्या सुरुवातीलाच भेटतो तो एक वेडा. हा वेडा जन्मजात नाही. आपल्या पेशाशी, पेशातल्या गृहीत नीतिमत्तेशी प्रामाणिक असलेला हा 'कुंभार' आडनावाचा एक शिक्षक आहे. त्याला शाळेत नोकरीला घेतलं जातं आणि चार-सहा वर्ष राबवून घेतल्यावर एके दिवशी तडकाफडकी काढून टाकून त्याच्या जागेवर संस्थाचालकाचा नातेवाईक असलेल्या एका वशिल्याच्या तट्टूला नोकरीवर ठेवलं जातं. अत्यंत दारिद्र्यातून शिक्षण घेऊन शिक्षक झालेला हा कुंभार एका क्षणात रस्त्यावर येतो आणि पुढचे ताण सहन न होऊन थेट वेडा होतो. रस्त्यावर दगड-विटांचे तुकडे मांडून, त्या तुकड्यांनाच विद्यार्थी समजून त्या वेडाच्या भरातही मनापासून शिकवत राहतो. खासगी शिक्षणसंस्थांमधून केल्या जाणाऱ्या शोषणाचा हा सगळ्यात अमानुष प्रकार. शिक्षकांच्या जागा मर्यादित असतात आणि पात्र बेकारांची संख्या अव्वाच्या सव्वा असते. त्यामुळे स्पर्धाही बेफाट असते. ही स्पर्धा अर्थातच गुणवत्तेची नसते. इथे तुमच्या शैक्षणिक गुणवत्तेपेक्षाही अधिक महत्त्व असतं ते तुमच्या आर्थिक क्षमतेला, राजकारणात उपयोगी पडू शकेल अशा तुमच्या जातीला, तुमच्या वैयक्तिक-सामाजिक उपयुक्ततेला किंवा उपद्रवशक्तीला. अशी 'गुणवत्ता' असलेले काही भाग्यवान लोक 'डोनेशन' नावाची लाच देऊन, वशिले लावून, संस्थाचालकांची जी-हुजुरी करून चिकटून जातात. प्रसंगी या लोकांना संस्थाचालकांच्या घरची कामं करण्यासाठीसुद्धा राबवून घेतलं जातं. संस्थाचालक उभ्या असलेल्या निवडणुकीत 'प्रचार' करण्यासाठी आपली स्वत:ची राजकीय मतं बाजूला ठेवून या शिक्षकांच्या झुंडीच्या झुंडी राबत असतात. या कादंबरीत असलेल्या सूर्यवंशी नावाच्या शिक्षकासारख्या एखाद्याला तर नोकरीच्या बदल्यात संस्थाचालकाच्या न खपणाऱ्या कुरूप मुलीशी लग्नसुद्धा करावं लागतं. पर्मनंट नसलेल्या एखाद्याला मनात येईल तसा त्रास देऊन काढून टाकून त्याच्या जागेवर भक्कम डोनेशन देणाऱ्याला घेऊन टाकणं, हा सर्रास चालणारा प्रकार असतो. परिणामी, एखादा कुंभारगुरुजी असा वेडा होऊन जातो. कुणी वेडे होतात, कुणी नैराश्याचे बळी होतात, तर कुणी व्यवस्थेच्या चक्रात निव्वळ मुर्दाड होऊन जमेल तसं फक्त जगत राहतात.

जे नोकरीत कायम होतात त्यांना नियमानुसार बऱ्यापैकी वेतन मिळायला लागतं. ते घर, शेती, गाव सोडून नोकरीच्या ठिकाणी किंवा जवळच्या शहरात स्थायिक होतात. त्यांच्या अंगावरची, कपड्यांवरची पिढ्यान्पिढ्या चढलेली मातीची पुटं धुवट होऊ लागतात; पण तेवढ्याने ते सुखी होतात, त्यांच्यामागची मूळची व्यवधानं संपतात असं नाही. शेतीव्यवस्था किंवा कुटुंबव्यवस्थेचे अनेकपदरी बंध तरीही त्यांच्या आयुष्याला वेढून असतातच. लहरी निसर्ग, अत्यंत विषम पद्धतीने बदललेलं ऋतुमान, शेतीचे पिढीगणिक होत गेलेले तुकडे, रासायनिक खतांनी संपून गेलेला जमिनीचा कस, अशा अनेक कारणांनी शेती व्यवसाय प्रचंड आतबट्ट्यात आलेला आहे. नुकतंच नोकरीला लागून पांढरपेशा जीवनशैलीत प्रवेश केलेल्या या शिक्षकांना (किंबहुना ग्रामीण पार्श्वभूमीतून कोणत्याही प्रकारची नोकरी मिळवलेल्या कुणालाही) या मोडकळीला आलेल्या शेतीला, घराला आधार देत राहावं लागतं. हे 'आधार देणं'ही केवळ चांगुलपणावर आधारलेलं असतं असं नाही. हा आधार देत राहण्याची जवळजवळ सक्तीच असते. आई-वडील, भाऊ-बहीण, नातेवाईक यांच्या अपेक्षांचा रेटाच एवढा असतो की त्या पुरवता पुरवता या नोकरदारांची पुरेवाट होते. त्यातही वडील किंवा भाऊ यांच्यापैकी कुणी व्यसनाधीन झालेले असतील तर समस्या आणखी गंभीर होऊन जातात. श्रीशैल्य बिराजदारच्या शेती कसणाऱ्या मन्मथअण्णा या व्यसनाधीन भावाच्या संदर्भाने ग्रामीण भागात अतिशय उग्र स्वरूप धारण केलेल्या या व्यसनातून निर्माण होणारे ताण दाखवण्याचा आणि या समस्येच्या मुळाशी जाण्याचाही सुरेंद्र पाटलांनी प्रयत्न केलेला आहे.

इथे कदाचित कुणी म्हणेल, की व्यसनाधीनता हे ज्याचं त्याचं पाप. त्यात शेतीचा किंवा ग्रामीण-शहरी जीवनशैलीचा काय संबंध? वरकरणी हे म्हणणंही योग्य वाटेलसं असलं तरी ते फारसं खरं नाही. ग्रामीण भागातल्या व्यसनाधीनतेला वैयक्तिक दुर्गुणांचे संदर्भ लावता येणं कठीण



**नोकरी आणि गावाकडचं घर, गावाकडची माणसं सांभाळताना करावी लागणारी तारेवरची कसरत यापूर्वी आनंद यादवांच्या 'नांगरणी', 'घरभिंती'सारख्या आत्मवृत्तांमधून किंवा इतरही लेखकांच्या अनेक कथा-कादंबऱ्यांमधून मराठी साहित्यात आलेली आहे. त्या कसरतीमधलं विदारकपण आणि एकूणच शिक्षणव्यवस्थेतील, समाज आणि कुटुंबव्यवस्थेतील निर्घृणता, त्यातले ताण आणि ते सोसताना, सोडवताना संवेदनशील मनाची होणारी वास्तवदर्शी फरफट पुन्हा एकदा समजून घेण्यासाठी 'झुलीच्या खाली' ही छोटेखानी कादंबरी अधिक मदत करते हे निर्विवाद आहे.**



आहे. सुखवस्तू शहरी माणसं संध्याकाळी बारमध्ये बसून पितात ते 'पिणं' आणि दोन-अडीच एकर दुष्काळी जमीन असलेला कुणी शेतकरी पितो ते 'पिणं' याच्यात फरक असतो. ग्रामीण भागातल्या कुठल्याही समस्येची मुळं शेतीशीच निगडित असतात. कितीही कष्ट केले तरी कष्टांना फूल येत नाही हे लक्षात येतं. सततची नापिकी, दुष्काळ यांनी लादलेले ताण भयावह स्थितीपर्यंत ताणले जातात तेव्हा सामान्य शेतकरी व्यसनाकडे वळतो. अर्थात हे एवढंच कारण असतं असं नाही, इतरही कारणं असू शकतील; पण मुख्यत: शेतीच्या दलदलीत रुतलेले पाय शेतकऱ्याला अधिकाधिक अवनतीकडे घेऊन जातात हे खरं आहे. असा कुणी व्यसनी घरात असेल तर नोकरदार माणसाला आपली नोकरी, आपलं शहरातलं कुटुंब, शहरी गरजा आणि गावातलं कुटुंब, तिथल्या घरातल्या आणि शेतीतल्या गरजा असं सगळंच ओझं पेलून धरावं लागतं. हे पेलून धरणं सोपं नसतं. अनेक प्रकारच्या भौतिक, मानसिक जखमा होतात. या जखमांना 'झुलीच्या खाली'मधून सुरेंद्र पाटलांनी समर्थपणे उघडं केलं आहे.

सुरेंद्र पाटील हे स्वत: शिक्षक आहेत. ते स्वत: शेतकरी कुटुंबातून आलेले आहेत. त्यामुळे 'झुलीच्या खाली'ला त्या भोवतालातल्या वास्तवाचा अतिशय भक्कम असा आधार आहे. कसलीही रंजनमूल्यं सांभाळत बसण्याचा आटापिटा न करता सुरेंद्र पाटील थेट जगण्याला भिडतात आणि या जखमा उघड्या करायला लागतात, तेव्हा ते वाचत असताना कधी आपण हतबल होतो, कधी हादरून जातो तर कधी विषण्णतेने मनाला ग्रासून टाकलं जातं.

शेतीच्या दुरवस्थेमुळे आलेली हलाखी कुटुंबप्रमुख व्यसनाच्या आहारी गेल्यामुळे अधिकाधिक गडद होत जाते तेव्हा ती त्या कुटुंबातल्या प्रत्येक सदस्याच्या आयुष्यावर परिणाम करत जाते. आर्थिक दुरवस्थेमुळे 'पत' घसरत चाललेली असतानाच व्यसनामुळे चार लोकांत मान ताठ ठेवता येणंही कठीण होऊन बसतं. सामाजिक प्रतिष्ठा धोक्यात येते. जुन्या वातावरणात वाढलेले, जगलेले आई-बाप जीव जाळून घेऊ लागतात, बायका-पोरांची परवड व्हायला सुरुवात होते. भांडणं होऊ लागतात. त्या एका कुटुंबापुरता त्यांचा आसमंत पुरता गुदमरलेला होऊन जातो. घरातला नोकरदार मुलगा, भाऊ जर संवेदनशील असेल तर हे सगळं सावरून धरण्यासाठी त्याला आर्थिक, सामाजिक आणि मानसिक अशा सर्वच पातळ्यांवर झगडावं लागतं. हे असं झगडताना श्रीशैल्य बिराजदारची होणारी दमछाक सुरेंद्र पाटलांनी प्रत्ययकारक शैलीत रंगवली आहे.

नोकरी आणि गावाकडचं घर, गावाकडची माणसं सांभाळताना करावी लागणारी तारेवरची कसरत यापूर्वी आनंद यादवांच्या 'नांगरणी', 'घरभिंती'सारख्या आत्मवृत्तांमधून किंवा इतरही लेखकांच्या अनेक कथा-कादंबऱ्यांमधून मराठी साहित्यात आलेली आहे. त्या कसरतीमधलं विदारकपण आणि एकूणच शिक्षणव्यवस्थेतील, समाज आणि कुटुंबव्यवस्थेतील निर्घृणता, त्यातले ताण आणि ते सोसताना, सोडवताना संवेदनशील मनाची होणारी वास्तवदर्शी फरफट पुन्हा एकदा समजून घेण्यासाठी 'झुलीच्या खाली' ही छोटेखानी कादंबरी अधिक मदत करते हे निर्विवाद आहे.

●

**बालाजी सुतार**
चलभाष : ९३२५०४७८८३
majhegaane@gmail.com

**सुरेंद्र पाटील**
चलभाष : ९४२३२३४९२७
surendrapatil121@gmail.com






सुमारे सातशे वीस वर्षांपूर्वी- शके १२१८ च्या कार्तिक वद्य त्रयोदशीस संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांनी पुण्यभूमी अलंकापुरी अर्थात आळंदी येथे संजीवन समाधी घेतली. या काळासंबंधाने संत जनाबाई, विसोबा खेचर, संत चोखामेळा अशा काही तत्कालीन संतांनी अभंगरचना केल्या आहेत; पण या सर्वांमध्ये या समाधिसोहळ्याचे सर्वांगीण आणि हृद्य चित्रण केले आहे ते संतश्रेष्ठ नामदेवांनी.

'सखा विरळा ज्ञानेश्वर । नामयाचा जो जिव्हार।।' असे संत जनाबाईंनी म्हटले आहे. ज्ञानदेव आणि नामदेव हे समकालीन आणि समवयस्क. दोघांमध्ये जिवाभावाचे सख्य होते. ज्ञानदेवांची महान योग्यता आणि अतुलनीय कार्य नामदेवांनी जाणले होते आणि नामदेवांची दिव्य, विरागी वृत्ती, ज्ञानसंपन्नता आणि भक्तीची उत्कटता यांतून ज्ञानदेवांनी त्यांची महनीयता ओळखली होती. दोघांनी पाच-सहा वर्षे अखंड एकत्रित तीर्थयात्रा केल्या. तेव्हापासून दोघे एकमेकांचे जिवलग बनले होते. अशा वेळी ज्ञानदेवांनी आपल्या समक्ष संजीवन समाधी घ्यावी ही गोष्ट नामदेवांच्या जिव्हारी लागली होती. त्यांनी समाधिप्रसंगाचे केलेले चित्रण यामुळेच अत्यंत करुणार्त आणि हृदयंगम असे उतरले आहे. नामदेवांच्या अंतःकरणातील आत्यंतिक घालमेल विलक्षण आर्ततेने त्यांच्या शब्दाशब्दांतून झरत राहिली आहे.

*नामा म्हणे देवा देखवेना मज ।*
*ब्रह्मीं ज्ञानराज मेळविला ।।*

या दोनच चरणांमधून त्यांची वेदना उत्कटतेने प्रत्ययाला येते.

ज्ञानदेव आणि नामदेव- दोघेही श्रेष्ठ योगी होते. दोघेही आरंभी 'शैव' होते. ज्ञानदेवांना निवृत्तिनाथांचा आणि नामदेवांना विसोबा खेचर या गुरूंचा अनुग्रह लाभलेला होता. विटेवरचा सावळा विठ्ठल हे निर्गुण, निर्विकल्प परब्रह्मच आहे, ही खूण दोघांनाही पटली होती. त्यामुळे संजीवन समाधी घेणारे महान योगी ज्ञानेश्वर आणि त्या घटनेचे साक्षीदार होऊन अवघा पट समर्थपणे उलगडणारे परमयोगी नामदेव हे दोघेही मराठी वाङ्मयात चिरंजीव झाले आहेत. संजीवन समाधी हा ज्ञानेश्वरांच्या जीवनाचा, कार्यकर्तृत्वाचा कळस



**कार्तिक वद्य त्रयोदशी या दिवशी संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांनी आळंदी येथे संजीवन समाधी घेतली. ज्ञानदेवांचा 'जिव्हार' असलेल्या संत नामदेवांनी या समाधिसोहळ्याचे केलेले हे हृद्य चित्रण.**



# बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ!



असेल, तर त्या सोहळ्याचे सहजस्फूर्त, अकृत्रिम असे प्रत्यक्ष वर्णन हा नामदेवांच्या वाङ्मयाचा कळसाध्याय आहे.

■

ज्ञानदेवांनी अलंकापुरी येथे समाधी घेण्याची इच्छा विठ्ठलाकडे व्यक्त केली, त्या वेळेचेही नामदेव साक्षी होते. ते म्हणतात-

*भावें विठ्ठलें केली गोष्टी ।*
*ज्ञानदेवें अपूर्व इच्छिलें पोटीं ।।*

आणि मग ज्ञानदेवांची इच्छा जाणून ती पूर्ण करावी, असे रखुमाईने विठ्ठलाला सांगितले. या प्रसंगाचे वर्णन करून नामदेवांनी म्हटले आहे-

*अष्टोत्तरशें तीर्थें सारीं । ओयें आलीं अलंकापुरी ।*
*वाद्यें वाजतातीं गजरीं । कीर्तनलहरी अमृताची ।।*

पुण्यनगरी अलंकापुरी ज्ञानदेवांच्या संचितामुळे अमृतलहरींनी उचंबळून आली आणि ज्ञानदेव तर लौकिक जगाच्या पार जाऊन हरिस्मरणाच्या अपार आनंदात निमग्न होऊन गेले.

नामदेव महाराज याचे वर्णन करताना म्हणतात-

*जैसा कस्तुरीचा सुगंधु । अनुभवी न म्हणतीच बद्धु ।*
*तैसा औटपीठाचा नादु । आठवी गोविंदु आवडीन ।।*

(कस्तुरीचा सुगंध ज्याप्रमाणे बांधून ठेवता येत नाही, तो आपसूकच सर्वत्र दरवळतो, त्याप्रमाणे औटपीठ चक्रावरील अनाहताचा नाद ज्ञानदेवांच्या हृदयाकाशात सर्वत्र घुमून राहिला आणि मग गोविंदाच्या स्मरणात ते तल्लीन होऊन गेले.)

'कुंडलिनीयोग' हे नाथपंथाचे वैशिष्ट्य आहे. ज्ञानदेव आणि नामदेव हे दोघेही नाथपंथी योगी होते. कुंडलिनीयोगाच्या द्वारेचे ज्ञानदेवांनी समाधी घेतली. त्याचे तपशील त्यामुळेच नामदेव पूर्णतया अधिकाराने आणि अचूकपणे मांडू शकतात. कुंडलिनी जागृतीच्या प्रवासातील एक अतिशय महत्त्वाचा टप्पा त्यांनी वरील चार चरणांत अगदी थोडक्यात पण अतिशय ताकदीने वर्णिला आहे. त्याचे स्पष्टीकरण असे-

योगाच्या पश्चिम मार्गातील सहा चक्रांपैकी 'औटपीठ' हे चौथे चक्र आणि 'भ्रमरगुंफा' हे पाचवे चक्र आहे. औटपीठ चक्राची 'ओंकार' ही मात्रा आहे. जागृत झालेली कुंडलिनी शक्ती जेव्हा औटपीठ चक्रावर येते, तेव्हा ती 'भ्रमरगुंफा' या चक्रामध्ये भ्रमराच्या गुंजारवासमान होणाऱ्या अनाहत नादाची अनुभूती औटपीठ चक्रावरच घेऊ लागते. औटपीठावर ऐकू येणारे हे 'नादब्रह्म' म्हणजे परब्रह्माचे पहिले प्रतीक आहे. गोविंदाचे हे पहिले दर्शन आहे. त्यात ज्ञानदेव तल्लीन झाले आहेत, असे वर्णन येथे नामदेवांनी समर्थपणे केले आहे.

ज्ञानदेव आणि नामदेव यांच्या यौगिक अनुभूतीनुसार विठ्ठल आणि रुक्मिणी ही कशाची प्रतीके आहेत याचेही विवरण यानंतरच्या चार चरणांमध्ये नामदेवांनी केले आहे -

*बौद्ध अवतार चक्रपाणी ।*
*सत्रावी कळा माय रुक्मिणी ।*
*जाणत असे अंतःकरणीं । भक्त इच्छा।।*

विठ्ठल आणि रुक्मिणी यांच्या मूळ स्वरूपाचे वर्णन करताना येथे नामदेव म्हणतात, की विठ्ठल हा श्रीकृष्णाचा मूळ ज्ञानस्वरूपी बुद्धावतार आहे आणि रुक्मिणी ही या ज्ञानरूप परब्रह्माची ज्ञानशक्ती म्हणजेच कुंडलिनीयोगाच्या मार्गाने योगिजनांना प्राप्त होणारी 'सतरावी कला' आहे. हीच व्योमचक्रातील 'चंद्रामृतरूपी जीवनकला' होय.

'रुक्म' हा वैदिक शब्द असून त्यांचा अर्थ 'तेजस्वी', 'प्रकाशमान' असा आहे. योगमार्गातील शेवटचे 'सहस्रदलचक्र' किंवा 'ब्रह्मरंध्र' हे 'परब्रह्माचे घर' आहे. तेथेच ही चित्कला किंवा चिच्छक्ती वास करते. योग्यांना ध्यानावस्थेत हे तेज, ही कला सोनेरी, पीतगौर किंवा निळ्या वर्णात प्रतीत होते. ही चित्कला परब्रह्माच्या ठायीच असल्याने हे दोन्ही भिन्न नसून एकरूपच आहेत, ही अद्वैतानुभूती जेव्हा योग्यांना येते तेव्हाच त्यांना ब्रह्मप्राप्ती होते.

नामदेवांनी योगमार्गातील हे सारे गूढ वरील केवळ चार चरणांमधून प्रकट केले आहे. परब्रह्मरूपी विठ्ठल आणि चित्कलारूपी रुक्मिणी या दोघांमध्ये अद्वैत असून ज्ञानदेवांनी अलंकापुरी येथेच समाधी घ्यावी, अशी त्यांची म्हणजेच पर्यायाने ईश्वराचीच इच्छा होती, हा सगळा आशय या चरणात सामावला आहे.

नाथपंथाची दीक्षा घेतलेल्या ज्ञानदेवांनी स्वतः या योगाचा अभ्यास करून अनुभूती घेतली होती. योगिजनांना प्राप्त होणाऱ्या या दिव्य अनुभूतीविषयी ज्ञानदेव म्हणतात-

*सहस्रदल बिंदु त्यात तेज दिसे ।*
*तें हो काय ऐसें सांगा मज।।*
*जेथें नामरूप वर्ण नाहीं बारे ।*
*तें हें रूप सारे चैतन्य बा ।।*
*ज्ञानदेव म्हणे अनुभवाची खूण ।*
*जाणे तो सुजाण अनुभविया ।।*

(सहस्रदल चक्रातील नाम, रूप, वर्ण इत्यादींच्या पलीकडे असलेल्या बिंदुमात्र तेजातून विश्वात्मक चैतन्याची अनुभूती येते तोच खरा योगी होय. ही अनुभूती शब्दांच्या पलीकडची असल्याने अनुभव घेऊनच ती जाणावी लागते.) अशा वेळी- 'शरीरेंचि ब्रह्म होयें ।' किंवा 'देहींचि ब्रह्मत्वा आलें।' असा त्या योग्याचा अनुभव असतो. ब्रह्मात्मऐक्याच्या या अवस्थेत योग्याचे शरीर विलक्षण देदीप्यमान बनते. आत्मज्योतीच्या या तेजाने मृत्यूही भयभीत होतो आणि जरा-मरण यातून योग्याला मुक्ती मिळते, असे ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या पाचव्या व सहाव्या अध्यायात सांगितले आहे.

अशा तऱ्हेने हा कुंडलिनीयोग योग्याला चिरंजीवित्व म्हणजेच अमरत्व देतो. या योगाच्या आधारे संजीवन समाधी घेण्यासाठी ज्ञानेश्वरांनी पंढरपूर हे क्षेत्र सोडून अलंकापुरी हे

स्थळ का निवडले याचेही उत्तर ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात आपल्याला मिळू शकते. येथे ज्ञानदेवांनी योग्याने समाधीसाठी कोणत्या प्रकारचे स्थान निवडावे याचा विस्ताराने ऊहापोह केला आहे. त्यांनी म्हटले आहे-

*जेथें आराणुकेचेनि कोडें ।*
*बैसलिया उठो नावडे ।*
*वैराग्यासी दुणीव चढे ।*
*देखिलिया जे ॥*
*जो संतीं वसविला ठावो ।*
*संतोषासि सावावो ।*
*मना होय उत्सावो ।*
*धैर्याचा ॥...*

(जेथे विश्रांतीसाठी बसले असता उठावेसेच वाटत नाही आणि जे स्थळ पाहताच वैराग्य दुणावेल, जेथे संतांचे, सत्पुरुषांचे वास्तव्य आहे आणि त्यामुळे जेथे मन समाधान पावेल, त्याला धैर्य प्राप्त होईल, असे स्थान योग्याने समाधीसाठी निवडावे.)

याशिवाय जेथे योगाभ्यास विनासायास होऊन तो आत्मानुभूतीत पर्यवसित होईल, जेथे फारशी वर्दळ किंवा जंगली श्वापदे वगैरे नसतील, जी जागा निसर्गसुंदर असेल, अमृतासारखी फळे, सुंदर फुले-झाडे, पक्षी, निर्झर, मंद वायूच्या झुळुका यामुळे जेथे मनास आल्हाद वाटेल, अशी ती जागा असावी. अशा प्रकारे त्या शांत, रम्य स्थळाचे नानापरीने सुरेख वर्णन करून ज्ञानदेवांनी म्हटले आहे, की

*परि आवश्यक पांडवा । ऐसा ठावो निवडावा ।*
*तेथे निगूढ मठ होआवा । की शिवालय ॥*

(जेथे सहज पोहोचता येईल असा एखादा मठ किंवा शिवालय त्या ठिकाणी असणे आवश्यक आहे.) हे सारे समजावून देताना ज्ञानेश्वरांनी योग्याचे समाधिस्थान कसे असावे, तेथे आसनव्यवस्था, इतर व्यवस्था कशी असावी या सर्व बाबीही बारकाईने स्पष्ट केल्या आहेत. हे सारे मुळातूनच वाचण्यासारखे आहे.

येथे ज्ञानदेवांनी सांगितलेला महत्त्वाचा निकष म्हणजे त्या ठिकाणी शिवालय असावे. ज्ञानेश्वर हे 'शैव' योगी होते. पंढरपूर हे भूवैकुंठ असले, तेथे शिव आणि विष्णू यांचे ऐक्य असले, तरी आळंदी हे केवळ 'शैव' क्षेत्र आहे. तेथील सिद्धेश्वर हे जुनाट शिवपीठ आहे. त्यामुळे अनेक सिद्धांनी येथेच समाधी घेतली आहे. ज्ञानेश्वरांनी तेथे समाधी घेण्याचे प्रयोजन हेही आहे.

■

ज्ञानदेव-नामदेव यात्रेहून परत आल्यानंतर शके १२१८ मध्ये कार्तिकी यात्रेच्या प्रसंगी ज्ञानदेवांनी समाधी घेण्याचा मनोदय विठ्ठलाकडे व्यक्त केला आणि काला झाल्यानंतर पंढरीची यात्रा आळंदीला आली. त्या वेळी ज्ञानदेव 'उन्मनी' अवस्थेत गेले होते. त्यांच्या निर्णयाने त्यांच्याकडे पाहताना नामदेवांचे हृदय विदीर्ण होत होते. ते विठ्ठलाला तळमळून सांगत होते-

*औरहात ध्वनी चित्तवृत्ति जेथ।*
*उजळली ज्योत तन्मयाची।*
*नामा म्हणे देवा करा सावधान।*
*नाहीं देहभान ज्ञानदेवा ॥*

'उन्मनी' अवस्था म्हणजे जागृती, स्वप्न, सुषुप्ती आणि तुर्या या चारही अवस्थांच्या पलीकडची मनरहित, कल्पनाशून्य अवस्था. या अवस्थेत चित्ताचा लय होतो आणि ते परमतत्त्वात विलीन होते. औटपीठ चक्रावरील अनाहत नादात ज्ञानदेवांची चित्तवृत्ती दंगली होती आणि त्या तन्मयतेत अंतरंगात आत्मज्योत उजळली होती. या अवस्थेतून त्यांना देहभानावर आणावे असे नामदेव देवाला विनवीत होते.

नामदेवांचे अंतरंग विठ्ठलमयच झालेले होते. आपल्याबरोबर विठ्ठल सतत आहे, अशी त्यांची प्रचिती होती. यातून त्यांचा विठ्ठलाशी अखंड संवाद चाललेला असे. ज्ञानदेवांना विठ्ठलच समाधी देत आहे, अशी त्यांची धारणा असल्याने या समाधिवर्णनात विठ्ठल प्रमुख भूमिकेत अवतरलेला दिसतो. नामदेव एक तर आपल्या हृदयातील आर्त विठ्ठलाला सांगतात किंवा मग स्वतःशीच संवाद करीत ज्ञानदेवांच्या चिरवियोगाची असह्य वेदना शब्दांकित करतात-

*कासावीस प्राण मन तळमळी ।*
*जैसी का मासोळी जीवनावीण ॥*
*दाही दिशा वोस वाटंती उदास ।*
*करिताती सोस मनामाजिं।*
*नामा म्हणे देवा वाटतसे खंती ।*
*चालली विभूति योगियांची ॥*

अशा अत्यंत खिन्न, विमनस्क अवस्थेत नामदेव आपल्या चार मुलांकडून समाधीची पूर्वतयारी करवून घेत होते.

*नारा विठा गोंदा पाठविला महादा ।*
*साहित्य गोविंदा सांगितलें ॥*
*तुळसी आणि बेल-दर्भ आणि फुलें ।*
*उदक हें चांगलें भागीरथीचें ॥*
*नामा म्हणे देवा साहित्य करितां ।*

**ज्ञानदेव-नामदेव यात्रेहून परत आल्यानंतर शके १२१८ मध्ये कार्तिकी यात्रेच्या प्रसंगी ज्ञानदेवांनी समाधी घेण्याचा मनोदय विठ्ठलाकडे व्यक्त केला आणि काला झाल्यानंतर पंढरीची यात्रा आळंदीला आली. त्या वेळी ज्ञानदेव 'उन्मनी' अवस्थेत गेले होते. त्यांच्या निर्णयाने त्यांच्याकडे पाहताना नामदेवांचे हृदय विदीर्ण होत होते.**





अनुक्रमणिका

*आठवतें चित्ता खेद दुःख ।।*

नारा-विठा-गोंदा-महादा या नामदेवांच्या मुलांनी समाधीची जागा झाडून स्वच्छ केली. तेथे धुवट वस्त्राची घडी अंथरली. त्यावर तुळस-बेल पसरले. वर दूर्वा, दर्भ मोकळे टाकले. फुले वाहिली. गंध, अक्षता, पंचामृत, उदक अशी सर्व सामग्री, पूजासाहित्य सिद्ध केले. धूप-दीप उजळले. पण ही सारी सिद्धता करताना नामदेवांच्या मनीमानसी अपरिमित दुःख दाटलेले होते. तशातही ज्ञानदेव आता ब्रह्मस्वरूपी मिळणार, ही जाणीव सतत जागृत होती. नामदेव म्हणतात-

*लावियेला धूप निरंजन ज्योति ।*
*प्रकाशल्या दीप्ति तन्मयाच्या ।।*
*लागली उन्मनीं वैराग्याची धुणी ।*
*जागा निरंजनीं निरंतर ।।*

धूप-दीपांबरोबर ज्ञानेशांच्या अंतःकरणातील अद्वैताची ज्योत अखंड उजळत राहिली. विरागी ज्ञानदेव उन्मनी अवस्थेत गेलेलेच होते. आता त्यांना निरंजन अशा ब्रह्मस्थानी निरंतर स्थान लाभणार होते.

■

सिद्धेश्वराच्या मंदिरातील नंदीच्या खाली विवर होते. तेथे तळघरात समाधीची सगळी सिद्धता केलेली होती. बाहेर भावव्याकूळ वैष्णवांचा मेळा जमला होता. ज्ञानदेवांसारखा असामान्य ज्ञानी योगी योगाच्या साहाय्याने संजीवन म्हणजे जिवंत समाधी घेणार, ही वार्ता पंढरपूरला कित्येक सहस्र वारकऱ्यांना समजली, तेव्हा उधाणलेल्या मनांनी, खांद्यावर भागवतधर्माची पताका घेऊन ते आळंदीकडे निघाले. इंद्रायणीच्या दोन्ही तीरांवर त्यांची दाटी झाली. सर्वांची मने ज्ञानदेवांच्या निर्णयाने कातर झाली होती. ज्ञानराजांविषयीच्या भक्तिप्रेमाने ती काठोकाठ भरली होती.

*अल्याड पल्याड पताकांचें भार ।*
*मध्यें मनोहर इंद्रायणी।।*
*नामा म्हणे तेथे पताकांचें भार ।*
*केव्हडें भाग्य थोर ज्ञानोबाचें ।।*

वैष्णवांची भक्ती-प्रेम-जिव्हाळा पाहून नामदेव असे भारावून गेले होते. ज्ञानदेवांच्या या भाग्याचे त्यांना अप्रूप वाटत होते.

■

निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांचे वडील बंधू आणि गुरूही. परमार्थातील एक उच्च अधिकारी. पण त्यांचे हृदय ज्ञानदेवांच्या निर्णयाने हलून आणि हेलावून गेले. मनात प्रचंड खळबळ माजली. हे सारे वर्णन करुणरसाने ओथंबलेले आहे.

*'ज्येष्ठाचिया आधी कनिष्ठाचें जाणें।*
*केलें नारायणें उफराटें ।।*

ईश्वराचा हा उलटा न्याय आहे, या जाणिवेने निवृत्तिनाथ सैरभैर झाले होते. त्याच वेळी ज्ञानदेव येऊन त्यांच्या चरणी लागले आणि म्हणू लागले-

*पाळिलें पोसिलें चालविला लळा ।*
*बा माझ्या कृपाळा निवृत्तिराजा ।।*
*स्वामीचियां योगें जालों स्वरूपाकार ।*
*उतरलों पार माया नदी ।।*

ज्ञानदेवांची वचने ऐकून तर निवृत्तिनाथांना उमाळा अनावर झाला-

*वोसंडोनि निवृत्ति आलिंगो लागला ।*
*आणिकांच्या डोळां अश्रू येती ।।*
*अमर्यादा कधी केली नाही येणें ।*
*शिष्य-गुरुपण सिद्धि नेलें।।*

असा ज्ञानदेवांचा गौरव निवृत्तिनाथ करू लागले तेव्हा-

*नामा म्हणे संत कासावीस सारे ।*
*लाविती पदरें डोळियांसी।।*

निवृत्तिनाथांनी सोपान आणि मुक्ताबाई यांचेही प्रेमभराने कौतुक केले. चौघांचे एकरूप जगणे ते आठवू लागले-

*निवृत्तिदेव म्हणे सांगतो या वाचे ।*
*राहणें चौघांचें एकरूप।।*
*त्रिवेणीचा ओघ जैसा एके ठायीं ।*
*तैसी मुक्ताबाई आम्हांमध्ये ।।*

निवृत्ती, सोपान, मुक्ताबाई यांचे शांतवन करावे तसे नामदेव त्या वेळी देवाला आळवीत होते. तेव्हा-

*निवृत्तीसी पोटीं धरिले देवानें ।*
*केलें समाधान अवघियांचें।।*

पण निवृत्तिनाथांचे सांत्वन काही केल्या होईना. नामदेव महाराज म्हणतात -

*निवृत्तिदेव म्हणे करिता समाधान ।*
*कांही केल्या मन राहत नाहीं ।।*
*बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट ।*
*ओघ बारा वाट मुरडताती ।।*
*बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा ।*
*तृण रानोमाळा पांगलेंसें।।*

अतिशय चपखल आणि समर्पक प्रतिमांमधून येथे नामदेव निवृत्तिदेवांची विकल अवस्था निर्माण करीत जातात.

*मायबापें आम्हां त्यागियलें जेव्हां ।*
*ऐसें संकट तेव्हां जाळें नाहीं ।।*

या निवृत्तिनाथांच्या उद्‌गारांनी तर नामदेवांचे अंतःकरण शतशः विदीर्ण झाले. त्यांना निवृत्तिनाथांचा शोक पाहवेना. त्यांच्या हृदयात उसळलेला आगडोंब सोसवेना आणि मग ते आत्यंतिक आर्ततेने देवाला विनवू लागले-

*'नामा म्हणे देवा पेटला हुताशन ।*
*करा समाधान निवृत्तीचें।।'*

ज्ञानराजाच्या समाधीमुळे दुःखावेगात बुडून गेलेल्या अवघ्यांचे चित्रण नामदेवांनी विलक्षण ताकदीने केले आहे.

*'ऐसें शब्दांचें व्यापकपण । देखिजे असाधारण ।।'*

असे ज्ञानदेवांनी इतरत्र केलेले शब्दसामर्थ्याचे वर्णन

नामदेवांच्या शब्दकलेला येथे तंतोतंत लागू पडते. समाधिप्रसंगी कोसळेला दुःखाचा महामेरू त्यांच्या समर्थ आणि आशयसंपन्न लेखणीने लीलया तोलला आहे.

प्रत्यक्ष समाधीचे नामदेवांनी केलेले वर्णन तर काळजाला घरे पाडीत जाणारे आहे -

*देव निवृत्ति यांनी धरिलें दोन्ही कर।*
*जातो ज्ञानेश्वर बैसावया॥*

असे काळजावर दगड ठेवून नामदेव म्हणतात. त्याच वेळी

*देव म्हणे ज्ञाना होई सावधान। माग वरदान मज कांही॥*

देव असे ज्ञानदेवांना म्हणतात, तेव्हा-

*ज्ञानदेव म्हणे शुद्ध कार्तिक मासीं।*
*व्रत एकादशी स्वामींकडे॥*

कृष्णपक्षीं व्रत हरिदिन परिपूर्ण! मागितला मान ज्ञानदेवें॥

ज्ञानदेवांनी देवाकडे इतकेच मागणे मागितले, की 'कार्तिकातील पहिल्या शुक्ल पक्षातील एकादशीचा सोहळा पंढरपूरला साजरा होतो, तसा कृष्ण पक्षातील एकादशीचा मान अलंकापुरीस द्यावा. त्या संपूर्ण दिवशी येथे हरिकीर्तन व्हावे...' हा विठ्ठलाचा आणि ज्ञानदेवांचा संवाद होतो आणि मग ज्ञानेश्वर समाधिस्थानी जाऊन बसतात. नामदेव म्हणतात-

*जाऊनि ज्ञानेश्वर बैसलें आसनावरी।*
*पुढे ज्ञानेश्वरी ठेवियली॥*
*ज्ञानदेव म्हणे सुखी केलें देवा।*
*पादपद्मीं ठेवा निरंतर॥*
*तीन वेळा तेव्हा जोडियेले करकमळ।*
*झांकियले डोळे ज्ञानदेवें॥*
*भीममुद्रा डोळां निरंजन मैदान।*
*झाले ब्रह्मपूर्ण ज्ञानदेव॥*

जिवाभावाचा सखा-सुहृद डोळ्यांदेखत समाधिस्थ झाला, ब्रह्मस्वरूपी एकाकार झाला आणि कमालीच्या व्यथित झालेल्या नामदेवांचे अवघे विश्वच अंधारले. ज्ञानसूर्याचा लोप झाला आणि एक न संपणारे दुःख हृदयात कायमचे वस्तीला आले. जीव पोरका पोरका झाला. माथ्यावरचे छत्रच हरपले. माय मराठीची अवघी लेकरे अनाथ झाली.

*नामा म्हणे आता लोपला दिनकर।*
*बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ॥*

इतक्या अल्पाक्षरांत आभाळाएवढी ही प्रचंड वेदना नामदेवांनी चितारली आहे.

ज्ञानदेवांचा संजीवन समाधीचा प्रसंग जितका अद्भुत आणि अतर्क्य, तितकाच नामदेवांच्या योगसाधनेची डूब लाभलेला त्याचा हा काव्यात्म वेध अविस्मरणीय आणि अ-क्षर आहे. मराठी सारस्वताच्या ग्रंथातील नामदेवांची ही अमृतवाणी आहे.

●

**प्रा. शीला निपुणगे**
चलभाष : ९८९०३५४३६२





अनुक्रमणिका





आदरांजली

# पाडगावकर
## 'ड' सापडलेले कवी

नीलिमा गुंडी

कविवर्य मंगेश पाडगावकर (१० मार्च १९२९ ते ३० डिसेंबर २०१५) यांचे साहित्यविश्व विविधांगी आणि समृद्ध आहे. वयाच्या १४व्या वर्षापासून अखेरपर्यंत ते काव्यलेखन करीत राहिले. आपल्या प्रदीर्घ साहित्यप्रवासात त्यांनी अनेक वाटा आणि वळणे ओलांडली. भावकविता, भावगीते, गझल, वात्रटिका, बालकविता, सामाजिक जाणिवेची कविता, उपरोध-विडंबनपर कविता, बोलगाणी, असे अभिव्यक्तीचे केवळ घाट शोधण्यापुरताच हा प्रवास मर्यादित नव्हता, तर सौंदर्यवादी ही मूळची कविप्रवृत्ती असताना मध्येच वास्तववादी प्रवृत्ती अंगीकारण्याचा (बहुधा काळाशी अनुकूलन साधण्याचा!) प्रयत्नही त्यात होता. 'धारानृत्य', 'जिप्सी'पासून सुरू झालेला हा त्यांचा प्रवास 'छोरी', 'उत्सव' या मार्गे रंगत गेला. 'विदूषक'मध्ये त्यांच्या जीवनगाण्याचा ठेका बदलला. 'सलाम', 'मोरू', 'उदासबोध'मध्ये तर ते समकालीन वास्तवाच्या खूपच जवळ राहून रोखठोक शैलीत भाष्य करू लागले. 'बोलगाणी'ने पुन्हा सूर बदलून पाहिला. यातली काही वळणे आशयाची होती, तर काही वळणे अभिव्यक्तीची होती. काव्याबरोबरच लघुनिबंध, व्यक्तिचित्रण, अनुवाद याही प्रांतांत त्यांच्या लेखणीने प्रवेश केला. त्यांनी बोरकर, विंदा यांच्या काव्याच्या संपादनाचे कामही जबाबदारीने केले. 'बायबल' आणि 'महाभारत' हे त्यांचे अनुवाद वेगळ्या धाटणीचे अनुवाद होते, तर मीरा, कबीर, सूरदास यांची कविता अनुवादित करताना भारतीय असे सांस्कृतिक संचित मराठीत शब्दबद्ध करणे त्यांच्या दृष्टीने महत्त्वाचे होते. त्यांना त्यांच्या साहित्यसेवेबद्दल 'महाराष्ट्रभूषण' आणि 'पद्मभूषण' असे सन्मान प्राप्त झाले. 'सलाम' या काव्यसंग्रहाला साहित्य अकादमीचा पुरस्कार प्राप्त झाला. त्याचबरोबर त्यांना मोठ्या प्रमाणावर लोकप्रियताही लाभली.



अशा एखाद्या मोठ्या कवीच्या लोकप्रियतेची आणि प्रभावक्षमतेची मीमांसा करताना त्याचे भाषाविषयक संवेदन हा घटक लक्षात घेणे फार महत्त्वाचे ठरते. त्यामुळे प्रस्तुत लेखात त्या अंगानेच विचार मांडले आहेत. एखादा कवी मोठ्या जनसमूहाकडून पिढ्यान्पिढ्या स्वीकारला जातो तेव्हा त्या समाजाशी भाषेच्या माध्यमातून त्या कवीचे दृढ असे नाते निर्माण झालेले असते. त्यामुळे ते नाते जाणून घेणे गरजेचे आहे. त्यासाठी त्या कवीने आशय आणि अभिव्यक्तीसाठी भाषिक क्षमतेचे उपयोजन किती प्रकारे केले याचा वेध घ्यायला हवा. भाषा नव्याने घडवणे, भाषिक नियम कलात्मक कारणांसाठी मोडणे, भाषेचे अंत:स्तर शोधणे, भाषेची बाह्य आणि अंगभूत लय हेरणे आणि अशा अनेक वाटांनी भाषेच्या गाभ्याशी खोलवर पोहोचणे, हे कोणत्याही मोठ्या कवीसाठी एक आव्हान असते. पाडगावकरांनीदेखील भाषेचे सामर्थ्य पुरेपूर जाणले होते, याची प्रचीती त्यांच्या काव्याचा अभ्यास करताना येते.

कवीची काव्यभाषा ही आशयानुगामी असणे, प्रत्ययकारी असणे इतकेच पुरेसे नसते. ती प्रसंगी आशयद्रव्य बनून स्वत:च



अनुक्रमणिका




मंगेश पाडगावकर

**मराठी काव्याच्या क्षेत्रात दीर्घकाळ बहुमोल योगदान दिलेले ज्येष्ठ कवी मंगेश पाडगावकर अलीकडेच काळाच्या पडद्याआड गेले. काव्याबरोबरच लघुनिबंध, व्यक्तिचित्रण, अनुवाद आदी प्रांतातही त्यांनी समृद्ध मुशाफिरी केली.**
**मोठ्या प्रमाणात लोकप्रियता मिळालेल्या या प्रभावशाली कवीच्या भाषाविषयक संवेदनांचा वेध घेणारा ज्येष्ठ कवयित्री-समीक्षक डॉ. नीलिमा गुंडी यांचा लेख.**

आकार घेत अनुभवाचे अंग बनावी लागते. पाडगावकरांच्या सौंदर्यवादी वृत्तीचा प्रत्यय देणाऱ्या प्रेम आणि निसर्गपर कवितांमध्ये हे घडताना दिसते. निर्मितीची रहस्यमयता सौंदर्यात्मक पातळीवरून रेखाटताना त्यांचे भाषिक सामर्थ्य पणाला लागलेले दिसते. ते लिहितात :

*'फुलवुनि गात्रीं इंद्रधनुष्यें*
*क्षितिज विंधुनी धुंद कटाक्षें*
*विरघळलेले नवथर उन्मद चंद्रकिरण मी प्याल्यें*
*मी चंचल होउनि आल्यें'* ('जिप्सी', १९५३)

येथे जोडाक्षरे, द-धचा अनुप्रास, एकार, सानुनासिक उच्चार, र-लचा अनुप्रास, ऱ्हस्व इकार व ऱ्हस्व उकार यां साऱ्यांचा तोल रचनेत असा सहज सांभाळला गेला आहे की भरतीच्या लाटेची आवेगपूर्ण गती कानामनाला जाणवावी. छंदोलयीबरोबरच यातील श्रुतिसुभगता, नादानुसंधान, अनुनाद आणि संवेदनांकित प्रतिमा यामुळे भाषा आशयसंपन्न झाली आहे.

असेच आणखी एक उदाहरण देते. त्यांची परमेश्वराचा साक्षात्कार निसर्गरूपांमध्ये अनुभवणारी भावस्थिती ('रोमँटिक मिस्टिक' वृत्तीची खूण) व्यक्त करणाऱ्या 'दर्शन' या कवितेतील या ओळी-

*'तू नाहिस? या वसंतातुनी कोण फुले मग?*
*तूं नाहिंस? दवबिंदुंत कां मग झगमग झगमग?*
*तुझ्यावाचुनी बीजांमधुनी कोण फुले रे?*
*तुझ्यावाचुनी रंगांमधुनी कोण खुले रे?*
*मीं कधिं न पाहिलें तुझें निराळेपण त्यांच्याविण*
*मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन'*

येथे 'जिप्सी'च्या पहिल्या आवृत्तीतील त्यांच्या या ओळी हेतुपूर्वक मुळाबरहुकूम घेतल्या आहेत. पाडगावकरांच्या काव्यात अनुस्वारांचे पैंजण मोठ्या प्रमाणावर होते. (ते नंतरच्या काळातल्या लेखनविषयक नियमांमुळे निघून गेले.) ती अनुस्वरांची रुणझुण हा त्यांच्या मूळ मालवणी बोलीचा प्रभाव असावा. (त्यांच्या आडनावातला 'पाडगांवकर'मधला अनुस्वार त्यांच्या स्वाक्षरीत टिकून राहिलेला दिसतो.) याही कडव्यातील अनुप्रास आणि प्रश्नचिन्हांचा वापर प्रभावी आहे. यातले प्रश्न हे काव्यदृष्ट्या 'प्रश्नालंकार' आहेत आणि त्याच वेळी प्रत्येक प्रश्नानंतर येणारे अल्पविराम कवीच्या शोधाने झपाटलेल्या मन:स्थितीतील चढउतार, भावनिक आरोह-अवरोह अचूक पोहोचवणारे आहेत.

पाडगावकर प्रतिमा निर्माण करताना भाषेची लय किती सूक्ष्मपणे हेरतात हे त्यांच्या 'पाऊस' (भटके पक्षी) या कवितेतील पुढील ओळी मनातल्या मनात वाचतानाही जाणवते. कुमार गंधर्वांसाठी लिहिलेल्या या कवितेतील ओळी अशा आहेत-

*'हजार तंबोऱ्यांची षड्‌जगाज झोकणारा*
*अवलिया पाऊस*
*गोरखनाथाच्या हाकेसारखा,*
*अलखनिरंजन पाऊस*
*हाक ऐकून नकळत उठून*
*चालू लागतो आपण*
*दुर्लंघ्य पहाडापल्याडच्या निर्विकल्पात*
*असा पाऊस'*

येथे पावसाची सघनता, रौद्रसुंदरता आणि अलौकिकता प्रत्ययाला आणून देण्यासाठी भाषेचा बाज बदलला आहे. त्यातील लय मंथर आहे. त्यात भरघोस वर्णनातून नि भारदस्त उच्चारातून विणलेले अद्‌भुताचे मोहन तर आहेच, शिवाय जोडीला नादसंमोहनही आहे.

कोणत्याही सर्जनशील कलावंतासाठी भाषा हे केवळ संज्ञापनाचे साधन नसते, ते जगण्याचे संवेदन व्यक्त करणारे स्पंदन असते. पाडगावकरांनी भाषेचे हे समग्र जगण्याला लपेटून राहणे लक्षात आणून दिले आहे. ते 'एकमेकांशिवाय' या कवितेत लिहितात-

*'असेच बसतात प्रत्यय*
*स्वार होऊन सगळे*
*उपाशी भाषेवर : आणि असा*
*चालतो आशयाचा प्रवास.*
*एकादाच अवलिया भाषेच्या*



[अनुक्रमणिका](#)

*देशातून परागंदा होतो.'* ('विदूषक')

भाषा ही जेव्हा अशी जगण्याचा अटळ उच्चार बनते, तेव्हा अभिव्यक्तीतील नावीन्य टिकवणे हे आव्हान ठरते. हे ओळखून ते स्वत:च स्वत:ची खिल्ली उडवतात नि लिहितात-

*'काय नवे सांगितले यात, म्हणशील.*
*काहीच नाही : भाषेचीच फक्त खाज'*
('विदूषक')

म्हणजे भाषेतून अभिव्यक्त होण्याची आदिम वासनाच साहित्यनिर्मितीचा मूलाधार आहे, कारण भाषा ही सुसंस्कृत मानवाची एक मूलभूत गरजच आहे. म्हणूनच 'अखेरची वही'मध्ये ते मृत्यू ही संकल्पना भाषेच्या अस्तित्वशून्यतेशीच जोडून देतात नि लिहितात :

*'जो उतरतो काळोखात*
*अज्ञात स्टेशनवर*
*त्याला हे ज्ञान असणंच*
*शक्य नाही.*
*कारण तिथे भाषाच नसते*
*अस्तित्वात'*



**कोणत्याही सर्जनशील कलावंतासाठी भाषा हे केवळ संज्ञापनाचे साधन नसते, ते जगण्याचे संवेदन व्यक्त करणारे स्पंदन असते. पाडगावकरांनी भाषेचे हे समग्र जगण्याला लपेटून राहणे लक्षात आणून दिले आहे.**

भाषेचे असे सर्वव्यापी स्वरूप जगताना अनुभवणारा कलावंत त्याच वेळी भाषेच्या मर्यादादेखील साहजिकच ओळखून असतो. त्यामुळे ते 'भाषा' ('त्रिवेणी') या कवितेत लिहितात :

*'बोधीच्या वृक्षाखाली अचानक भाषा*
*साक्षात्कारी मौनात मिटताना पाहिली,*
*कान्हुल्याच्या तान्हुल्याच्या ओठावरती भाषा*
*अर्थाच्या फासातून सुटताना पाहिली'*

पाडगावकरांसाठी भाषा ही अशी सतत चिंतनविषय झाल्यामुळे त्यांच्या काही कवितांमध्ये भाषानिष्ठ प्रतिमा केंद्रवर्ती दिसतात. 'अखेरची वही' या संग्रहातल्या 'खेळ', 'वाक्य' या कविता येथे आठवतात. 'जगणं हा खेळ असतो भाषेचा' हे त्या चिंतनाचे पालुपदच ठरते. भाषेतून अमूर्त संवेदन पोहोचवतानाची प्रक्रिया 'वाक्य'मध्ये येते. ते लिहितात,

*'मी तुझ्या केसांत माळलेलं वाक्य*
*दिसत नसलं तर नको दिसू देत;*
*पण शब्दांचा अंगभूत सुवास*
*तुला आला असेलच ना?'*

हा प्रश्न 'तो आणि ती' यांच्यापुरताच न राहता 'कलावंत आणि रसिक' यांच्यात भाषेद्वारा निर्माण होणाऱ्या भावबंधाविषयीही असतो. त्यांच्या 'कबुली ('विदूषक'), 'यमक', 'अस्सल' (गिरकी) याही कविता या संदर्भात लक्षात घेण्याजोग्या आहेत.

भाषेची सखोल जाण असल्यामुळेच 'मौन' ही भाषेची जणू सोळावी कळा असल्याचे त्यांना माहीत आहे. म्हणून त्यांच्या कवितांमध्ये 'शब्दांवर मौनाची जाळी', किंवा

*'श्वेतदित बसतो मौनावरती*
*शब्दांची, प्रतिमांची लेणी'*
(जिप्सी)

अशा प्रतिमा अधूनमधून येतात. त्यांची 'मौन' ('गिरकी') ही कविता या संदर्भात विशेष बोलकी आहे. ते लिहितात:

*'अलीकडे आणि पलीकडे जेव्हा*
*जातात जोडले शब्दांनी*
*तेव्हा शब्द स्वत:ची*
*ओळख करून देणारा*
*मौन हा नवाच*
*शब्द निर्माण करतात!'*

'शब्द' ('भटके पक्षी') या कवितेतून ते शब्दांचे बंदिस्तपण अचूकपणे पकडतात. शब्द हे 'व्याकरणाच्या घरातल्या निर्बुद्ध नोकरासारखे' असल्याची त्यांची तक्रार 'प्रसरणशील' शब्द दुर्मिळ झाल्यामुळे आलेली असते. ही अवस्था ओलांडण्यासाठी मग कवी वेगवेगळ्या पातळ्यांवरून भाषेचा धांडोळा घेतो. कधी 'यमकणे'सारखा शब्द निर्माण करतो.

'वात्रटिका'मध्ये मूलत: आलेली शब्दक्रीडा हाही त्या शोधाचा एक हलकाफुलका नि भाषा मळून घेण्यासाठीच्या सरावाचा प्रयत्न ठरतो. त्यामुळे

*'लाला लाला लालाला*
*आला आला सालाला*
*हा हा हा हा ही ही ही*
*यांना अर्थ काही नाही'*

हे वाचताना वाटते, की किशोरकुमारच्या गाण्यात जसे 'यॉडलिंग' असते, तसे पाडगावकरांच्या कवितांमध्येही असे निरर्थक ध्वनी लयबद्ध करण्याचे तंत्र अधूनमधून दिसते. उदा. 'छोरी'मधल्या 'गिरकी' कवितेतही 'ललललललला... ललललला' असे विमुक्ततेचा प्रत्यय देणारे ध्वनी येतात.

भाषा नेमकेपणे परजून ठेवण्यासाठी चटपटीतपणाबरोबर तल्लखपणाही लागतो. आजच्या 'ग्राफिटी'चे मूळ काही वेळा 'वात्रटिकां'च्या अशा स्वरूपात शोधता येते. तसेच 'ग्राफिटी'च्या जातीची ही ओळ पाहा-

*'नाव जगन्नाथ : आठव्या वर्षी हाती आली झोळी'*
(तात्पर्याची कविता - 'विदूषक')

यातला उपरोधिक श्लेश हाही असाच भाषिक कौशल्याचा पुरावा आहे. 'मोरू'मधली 'निबंधाची वही' ही कविताही येथे

आठवते. 'मोरू'मध्ये पाडगावकर समकालीन वास्तवातील राजकारणाचा आणि सांस्कृतिक पर्यावरणाचा बदललेला पोत लक्षात आणून देतात. रेडिओने 'शिंकरलेली' गाणी आवडू लागणे, हे सांस्कृतिक अध:पतनाचेच रूप असते.

हा बदल चित्रित करण्यासाठी ते भाषा खरोखरच केंद्रस्थानी आणतात. मुळात 'यांचं नाव मोरेश्वर, पण यांचा झाला मोरू' हे भाषिक अध:पतन हे कणाहीन बनलेल्या मध्यमवर्गीयांच्या सर्वंकष अध:पतनाचेच अर्करूप आहे. 'मोरू'मधल्या 'शब्दक्रम', 'कठीण शब्दांचा अर्थ' (ठोकशाही, खंडणी आणि भ्रष्टाचार या नव्या शब्दांचे अर्थ), 'राष्ट्रपतींना पत्र' या कविता भाषादृष्ट्या लक्षणीय आहेत. राष्ट्रपतींना पत्रातून मोरू कळवतो, की निवडणुकीसाठी 'टोळीयुद्ध', नेता याऐवजी 'टोळीहृदयसम्राट' आणि निवडणूकनिधीसाठी 'टोळीलूट' हे शब्द कायदेशीर करावेत! 'कॉमन मॅन'ने असे पत्र राष्ट्रपतींना लिहिणे हे त्याच्याबाबत दिवास्वप्न वाटावे असेच आहे, पण ते कवितेत तरी घडते हे महत्त्वाचे आहे. साठोत्तरी काळात सांस्कृतिक पर्यावरणामध्येही काही बदल होत होते. विशेषत: आपल्याकडे साठोत्तरी काव्यविश्वात नव्याने दाखल झालेले दलित, ग्रामीण, कामगार, स्त्रीवादी आदी काव्यप्रवाह रांगडी भाषा आत्मसात करून जोमदारपणे दाखल झाले होते. सामाजिक विसंगतींवर कठोरपणे प्रहार करीत होते. रोमँटिक कवितेचे तलम पोत प्रभाव गाजवत नव्हते. ते पाहून बहुधा पाडगावकर 'विचारवंत' (मोरू) या कवितेत लिहितात-

'शिव्यांना गुळगुळीत करीत करीत
सभ्य वस्तीत त्यांना घर घेऊन देणं
ही एक भाषेची फार मोठी शक्ती आहे!'

मुख्य म्हणजे पाडगावकरांच्या 'सलाम'मधील कविता वाचताना ते स्वत: भाषेची 'ही' शक्ती (तथाकथित अश्लील, तथाकथित बीभत्स भाषा)देखील काळानुरूप आत्मसात करताना दिसतात. त्याचबरोबर बंबय्या हिंदीची लकब, 'शिवाजी म्हणतो'सारख्या खेळामधील मंत्रशक्तीचा वापर, अनपेक्षितता (धक्कातंत्र), यादीवजा एकसुरी रचनेतून परिणामकारकरित्या सुचवलेली संवेदनाविहीनतेची जाणीव इत्यादींचा एकत्रित अनुभवही 'सलाम'मध्ये येतो. उदा.

*'बिळांना सलाम*
*बिळांतल्या उंदरांना सलाम,*
*घरातल्या झुरळांना सलाम,*
*खाटेतल्या ढेकणांना सलाम,*
---
*सलाम, भाइयों और भैनों, सबको सलाम.'*

तसेच

*'सावधान, खाली मान,*
*बंद डोळे, बंद कान'*

यासारख्या 'एक झिंदाबाद कविता'मधल्या ओळी आणीबाणीच्या काळातील सार्वत्रिक भीतीचे वातावरण नेमके पकडतात.

सामान्य माणसाला भय राजकीय नेत्यांमुळे वाटते, तसे धर्माचा बागुलबोवा करण्याच्या बुवांच्या करणीमुळेही वाटते. पाडगावकर भाषिक सामर्थ्याने या भयाचाही निचरा करू पाहतात. ते 'फोड' (विदूषक) या कवितेत लिहितात :

*'आध्यात्मिक पूर्णावस्थेत*
*ब्रह्म जसे जाणवते*
*अगदी तसा, तितकाच खरा*
*फोड फक्त जाणवला'*

येथे लौकिक पातळीवरचा खासगी स्वरूपाचा अनुभव आणि अलौकिक पातळीवरचा अनन्य (युनिक) स्वरूपाचा अनुभव यांची मोट बांधणे मार्मिक ठरते. या दोन पातळ्यांचा साधलेला संकरित प्रयोग उपरोधिक ठरतो. भाषासंकराद्वारेही पाडगावकर असाच परिणाम साधतात. 'उदासबोध'मधील 'स्मगलिंग माहात्म्य', 'लाचविज्ञान' आदी समास या दृष्टीने लक्षात घेण्याजोगे आहेत.

पाडगावकरांनी पुढच्या काळात 'बोलगझल', 'बोलगाणी' लिहिताना बोलीभाषेतली लय वापरायचा प्रयोगदेखील केला. त्यात कधी

*'घंटा, भजनं, बांगा ऐकून यांचे देव विटले,*
*जीव घेऊन देवळातून बाहेर धावत सुटले.'* (त्रिवेणी)

अशी 'फँटसी'सदृश रचना समोर येते आणि समूहाला ठाशीव आघाताने जागे करण्याचा प्रयत्न करते; तर कधी समुपदेशनाच्या सुरात हळुवारपणे संवाद साधत 'चिऊताई, चिऊताई, दार उघड' असा मन मोकळं करण्याचा मंत्र देते. त्यांच्या या कवितांना मिळालेली दाद लक्षात घेण्याजोगी आहे. या कविता आशयदृष्ट्या नव्याने काही सांगत नसल्या तरी त्या काव्याच्या अभिव्यक्तीचा घाट लवचिकपणे वाकवण्याचा प्रयत्न करतात.

सर्वसामान्यांना अभिव्यक्तीसाठी हा घाट सहज वापरणे शक्य झाले, हे हल्ली सोशल मीडियावरील रचना पाहताना जाणवते. पाडगावकरांच्या प्रभावक्षमतेची या संदर्भात नोंद घ्यायला हवी.

शेवटी पाडगावकरांनी एका लहान मुलाशी संवाद साधताना वापरलेले शब्द आठवतात. राणीच्या बागेतून हत्ती पाहून आलेला तो मुलगा 'हत्ती मोठ्ठा होता' असे सांगतो, तेव्हा त्याला भाषा साधनाच्या पातळीवरून सर्जनशील माध्यमाच्या पातळीवर नेता आली, असे पाडगावकर भाष्य करतात ('शोध कवितेचा') आणि एक कवी म्हणून तो 'ठ्ठ' स्वत:लाही सापडो, अशी इच्छा व्यक्त करतात. पाडगावकरांच्या काव्याचा अभ्यास करताना हे लक्षात येते, की त्यांना 'ठ्ठ'रूपी भाषेतले श्रेय गवसले होते.

●

**डॉ. नीलिमा गुंडी**
०२०-२४४८६०१५



अनुक्रमणिका





आदरांजली



# दभि
## समीक्षेची चित्रलिपी उलगडताना...

देवानंद सोनटक्के

**डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्या निधनाने मराठी समीक्षेच्या प्रांतात मौलिक योगदान दिलेला एक व्यासंगी, व्रतस्थ, मर्मग्राही समीक्षक काळाच्या पडद्याआड गेला आहे. प्राचीन व अर्वाचीन अशा दोन्ही साहित्यपरंपरांचा व्यासंग असलेल्या दभिंच्या विविध समीक्षाग्रंथांतून त्यांच्या वाङ्मयीन विचारांचा व्यापक पैस दिसून येतो. दभिंच्या व्यक्तिमत्त्वावर व समीक्षाविचारांवर प्रकाश टाकणारा तरुण आश्वासक समीक्षक प्रा. देवानंद सोनटक्के यांचा लेख.** ■■

वणीला बी. ए.ला शिकत असतानाच दै.'लोकमत'मधून डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे 'विहरणीच्या खुणा' हे सदर वाचत होतो. समीक्षेची गंभीर मांडणी. सोपी भाषा. संवादी शैली. साहित्यातील एकेका तत्त्वाचे, प्रश्नाचे विवेचन; तेही पांडित्यपूर्ण नव्हे, तर अनुभूतिजन्य. सूत्रबद्ध मुद्देसूद विचार, पण त्यातील क्रम मात्र एकमेकांत मिसळलेला. मला साहित्याची आवड होती, समज नव्हती; पण या लेखकाजवळ वाचकाशी संवाद साधण्याची, त्याला आपल्या आस्वादात सामावून घेण्याची तीव्र तळमळ आहे, हे ते लेखन वाचून जाणवत असे. त्यातून येणारे वेगवेगळे विषय व आशयाची उत्सुकता. त्यातूनच या लेखकाबद्दल एक आदर, आकर्षण व किंचित दडपणही निर्माण झाले. पुढेमागे या लेखकाच्या संपर्कात येऊ असे स्वप्नातही वाटले नव्हते. 'विहरणीच्या खुणा' म्हणजे काय ते कळत नव्हते. माझा मित्र सतीश म्हणायचा, ''अरे, हे चुकीचे छापून आले आहे. 'विरहणीच्या खुणा' असेच आहे ते!''. 'विरहिणी' म्हणजे काय ते माहीत होते. 'विहरणीच्या खुणा'चा अर्थ मात्र पुढे ज्ञानेश्वरांचे साहित्य वाचले तेव्हा कळला.

१९९६ ला एम. ए.ला नागपूर विद्यापीठाच्या मराठी विभागात व वसतिगृहात प्रवेश घेतला. त्या वेळी दभि या विभागातून निवृत्त झाले होते. त्यांच्या अध्यापनाची चर्चा व व्यक्तिमत्त्वाचा दबदबा परिसरात मात्र कायम होता. 'साहित्यशास्त्र शिकवावे ते दभिंनीच' असे सारे म्हणत. विद्यापीठात आहेस तर मग भेट तरी त्यांना, असे आमचे वणीचे सर सांगत. मी कार्यकारी संपादक असलेल्या वणीच्या 'रंगस्वानंद' दिवाळी अंकात त्यांच्या विद्यार्थिनी कल्पना पांडे-माळोदे यांनी दभिंवर लेख लिहिला होता. अंक घेऊन दभिंना भेटण्यासाठी मी व मित्र संजय 'सकाळ भेट वर्ज्य' असल्याने संध्याकाळी गेलो. अंक दिला. सहा वाजता ते आम्हाला पायी फिरायला फुटाळा तलावाकडे घेऊन गेले. त्यांनीच आमचा परिचय करून घेतला. नाव, गाव, पुस्तके, वाचन, अभ्यासक्रमाचे स्वरूप विचारले. मीही त्यांना शब्दशक्ती, अस्तित्ववाद अशा काही संज्ञा विचारल्याचे आठवते. शेवटी सर म्हणाले, ''माझ्या लेखनिकाला वृत्तपत्रात

नोकरी लागली आहे. मला लेखनिक हवा आहे. तुमच्यापैकी कुणी ते काम केले तरी चालेल.'' दभिंचा लेखनिक होण्यासाठी खूप जण आतुर असत. मात्र, त्याची काही एक पात्रता होती. त्याला सायकल असली पाहिजे. अक्षर व शुद्धलेखन चांगले हवे. शिवाय साहित्याची आवड हवी. यातले तिसरे सोडले तर मला सायकल नव्हतीच. अक्षर तर जोरदारच होते. त्यामुळे मी हा विचार मनातून काढून टाकला.

साधारणतः पंधरा दिवसांनी एका विद्यार्थाने मला दभिंचा लेखनिक होण्याचा निरोप दिला. मी सायकलची अडचण सांगितली, तर 'बाहेरची पत्रे, झेरॉक्स वगैरे कामे जुनाच लेखनिक करेल, अक्षर व शुद्धलेखनाची जबाबदारी माझी' असे सरांनी सांगितले. तेव्हापासून म्हणजे १९९६ ते २००२, नागपूर सोडेपर्यंत मी त्यांचा लेखनिक होतो. उणीपुरी सहा वर्षे. उणीपुरी यासाठी, की कुठल्या कारणाने जाणे झाले नाही तर धनंजय, दुलिराम, दीपक, नामदेव.. कुणीही त्यांचे डिक्टेशन घेण्यास तयारच असे. या काळात मला त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा, समीक्षानिर्मिती प्रक्रियेचा व विचार-लेखन प्रक्रियेचा जवळून परिचय झाला. आमच्यात कधी गैरसमज झाले नाहीत, वाद झाले नाहीत, कधी अंतराय पडला नाही. नोकरी, स्थलांतर या भौतिक कारणांनी दूर गेलो असलो तरी संपर्क कायम होता. काही नवे वाचले, शंका असल्या तर मी त्यांना फोनवर वा भेटून विचारत असे. त्यांनाही काही नवीन सुचले तरं ते फोन करून सांगत. लिहिले की फोनवरून वाचून दाखवत. त्याबद्दलच्या अनुकूल-प्रतिकूल प्रतिक्रिया जाणून घेत. 'हे नको' असे म्हटले की ते लगेच ते रद्द करत. 'तुमच्यापेक्षा जास्त समजते', ही वृत्ती त्यांच्यात नव्हती. विद्यार्थ्यांचे विरोधी मतही ते मोलाचे मानत. त्यातून तास-दीड तास चर्चा होत. त्या वेळी त्यांच्याशी झालेल्या चर्चा रेकॉर्ड करायला हव्या होत्या, असे आज तीव्रपणे वाटते. कायम ज्ञानाची ओढ व नव्याचा ध्यास हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे पैलू होते. एकेकदा ते गंमतीने म्हणत, ''चला, खूप विचार केल्यानंतर आता आपल्या लक्षात येतेय की विचार करण्यात अर्थ नाही.''



१.

सर पहाटे चारला उठत. अंघोळ करून वाचत असत किंवा लिहीत. नागपूरला दीपक रंगारी अगदी पहाटे त्यांच्याकडे जाऊन डिक्टेशन घेत असे. खूप महत्त्वाचा लेख असेल, त्यांना स्फुरण असेल तर क्वचित मलाही पहाटे बोलावत. डिक्टेशनला बोलावले असेल तर ते ठरलेल्या वेळी तयारच असत. लेखनिकाला त्यांनी कधी वाट पाहायला लावले नाही. कारण ते आविष्काराला आतुरच असत. 'आविष्कारातुरता' हा वाङ्मयीन गुणच आहे आणि तो कादंबरीकार वि. स. खांडेकरांकडे कसा होता याचे विवेचन त्यांनी 'कादंबरी : स्वरूप आणि समीक्षा' या ग्रंथात केले आहे. 'आविष्कारातुरता' निर्मितिप्रक्रियेच्या उत्कटतेतून येते, असे त्यांचे प्रतिपादन होते. 'निर्मितिप्रक्रियेची उत्कटता हे उत्तम कलाकृतीचे एक लक्षण आहे', असे म्हणून आशयातील उत्कटता वेगळी, अभिव्यक्तीची उत्कटता वेगळी आणि निर्मितिप्रक्रियेतील उत्कटता कशी वेगळी असते, तिचे लक्षण काय, असे सविस्तर विवेचनच त्यांनी केले आहे (पस्तुरी : २६ ते ३०). ज्ञानेश्वर-तुकाराम, मर्ढेकर-जी.ए., ग्रेस-चित्रे-नेमाडे आदींच्या लेखनात ही उत्कटता कशी आहे हे त्यांनी वेळोवेळी सांगितले. ही उत्कटता प्रतिभेचा गुण असतो आणि तो व्यासंग, स्फूर्ती, प्रज्ञा, आत्मनिष्ठा यांच्या साह्याने फुलतो, असे त्यांनी जे म्हटले आहे ते त्यांच्या समीक्षेबद्दलही खरे होते.



डिक्टेशनसाठी कोरे कागद पॅडला आधीच नीट लावून ठेवलेले असत. बैठक स्वच्छ

असे. सर प्रसन्न असत. गेलो की मीच अगरबत्ती लावत असे. देवासाठी नाही; प्रसन्न व सुगंधी वातावरणात डिक्टेशन घेता यावे म्हणून. डिक्टेशन घेणे म्हणजे नवशिक्या गायकाने तंबोरे जुळवत शिकत, मग गायनाला विलंबित व द्रुत लयीत सुरुवात केल्यासारखे असते. मन प्रसन्न व एकाग्र करत कागद, पेन व हात यांत योग्य अंतर राखत, लेखकाची गती पकडत, पूर्ण विधान ध्यानात ठेवून लिहिणे; ते करताना शुद्धलेखनाच्या चुका होणार नाही, अक्षरांचे वळण व लय बिघडणार नाही याची काळजी घेणे. लेखनिकाची ही अनुभूती इथून पुढे सेल्फीच्या जमान्यात येणे शक्य नाही. ही एक गुरुकुलातली ज्ञानपरंपरा होती. यात गुरूच्या व्यक्तिमत्त्वाच्या परस्पर आंतरक्रियेचा आणि प्रभावाचा योग जुळून येत असे. असो. दोन्ही बाजूंनी समास सोडून, शीर्षक दोनदा अधोरेखित करून, मग एक ओळ सोडून दभिंचे नाव व दोन ओळी सोडून परिच्छेद करून पहिले वाक्य लिहावयाचे. सर समोरच्या खुर्चीवर वा बैठकीवर बसून डोळे बंद करून किंवा दोन भुवयांच्या मध्ये बोटांच्या चिमटीने पकडून सांगत, ''श्री ज्ञानेश्वरांनी...''

लहान मुलाला पत्ता समजावून सांगावा तसे ते एकेक शब्द ऱ्हस्व-दीर्घासहित उच्चारत. शब्द, वाक्य, उपवाक्य, सगळी विरामचिन्हे, परिच्छेद यांसह सांगत. त्याकडे बारकाईने लक्ष देऊन तसा शब्द लिहायचा. लेखनिकाची गती तेच पकडत, त्यामुळे पुन्हा वाक्य सांगावे लागत नसे. मध्ये कधीही व कितीही थांबलो, शंका विचारली तरी; एवढेच नव्हे, तर अर्धवट राहिलेले डिक्टेशन दुसऱ्या दिवशी पुन्हा दिले तरी ते आधीचे वाक्य मुखपाठ सांगत. 'त्यापुढे असे लिहा' म्हणत. त्यांचे विचार, आकलन अत्यंत स्पष्ट असे. स्फूर्ती असल्याशिवाय, उत्कटतेशिवाय व आतून जाणवल्याशिवाय ते कधी लिहीत नसत. आविष्कारातुरता व निर्मितिप्रक्रियेची उत्कटता म्हटले ती हीच. त्यामुळे जरी सदरलेखन असले तरी दोन-तीन लेख आगाऊ जमा करून मगच सदर छापायला परवानगी देत. कुणी सांगितले, कुणी मागितले, परिचयाचे, जवळचे असे कुठलेही लौकिक नाते त्यांच्या समीक्षा-लेखनात प्रवेश करू शकत नसे. बाह्य-कारणाने त्यांनी कधीच समीक्षा लिहिली नाही. त्यांच्या समीक्षेची निर्मितिप्रक्रियाच वेगळी होती. ते चौफेर वाचत. साहित्यशास्त्र, सौंदर्यशास्त्र, विज्ञान, अध्यात्म, ज्योतिष्य, तत्त्वज्ञान, सगळे साहित्यप्रकार; प्राचीन-अर्वाचीन साहित्य, अगदी मेंदुविज्ञान, जनुकशास्त्र ते स्थापत्यकला... कोणतीही ज्ञानशाखा त्यांना वर्ज्य नव्हती. त्यांचे चिंतन सतत चालू असायचे आणि ज्या दिवशी आतून जाणवत असे त्या दिवशी ते सलग डिक्टेशन देत; मग कितीही वेळ लागो. त्यामुळे संध्याकाळी चार ते सहा अशी माझी वेळ असली तरी कधी रात्री दहा वाजत, तर कधी पूर्ण सुट्टी. ती नोकरी नव्हती, साधना होती. त्यामुळेच सायकल, अक्षर ही पात्रता नसूनही त्यांनी मला लेखनिक म्हणून निवडले?

**२.**

डिक्टेशन देताना थकवा आला तर मध्येच उठून दोरीवरील कपडे गोळा करणे, झाडांना पाणी घालणे अशी कामे ते करीत. ते म्हणायचे, ''या कामात आपला मेंदू गुंतलेला नसतो त्यामुळे चिंतन चालूच असते. शरीरालाही बदल मिळतो. कामात बदल म्हणजेच विश्रांती. चिंतन मुरले तरच आतून काही तरी नवे सुचते. तीच स्फूर्ती. आविष्कातुरता. हे आकलन प्रातिभ नसेल, नुसते बौद्धिक असेल तर मात्र लेखनात उत्कटता येत नाही, शैली रूक्ष होते.'' प्रातिभस्फुरण हीच श्रेष्ठ साहित्याची अट असते, असे ते म्हणत. हे त्यांच्या लेखनालाही लागू होत असे. 'आस्वादकाजवळ विमलप्रज्ञा' असावी असे अभिनवगुप्त म्हणतो. नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा-प्रतिभा असेल तरच कलाकृतीत नावीन्य येते, असे त्याचे म्हणणे होते. त्यामुळेच काव्याचा आस्वाद कुणालाही घेता येत नाही. कारण तो तार्किक नसतो. निव्वळ बुद्धी असेल तर तो आस्वादक कवितेला तर्क लावील. तर्क शास्त्राच्या आकलनासाठी आवश्यक आहे, साहित्याच्या नाही, असे सरांचे प्रतिपादन होते. त्यामुळे 'विमलप्रज्ञा' ही आस्वादाची अट व नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञा ही आविष्काराची अट असते. ही दोन्ही तत्त्वे त्यांच्याच समीक्षेत आहेत. त्यामुळेच त्यांच्या समीक्षेत रूक्षता, तर्ककठोरता नव्हती. निबंधवजा शैली नव्हती. ते आस्वादातून तत्त्वाचा शोध घेत. तत्त्वासाठी आस्वाद पणाला लावीत नसत.

'समीक्षा आणि निबंध' या लेखात दभिंच्या या गुणाचा प्रत्यय येतो. 'निबंध हा साहित्यप्रकार लेखकाच्या बौद्धिक शक्तीचा आविष्कार असतो. सामाजिक गरज, व्यावसायिक निकड किंवा विरंगुळा किंवा बौद्धिक हालचाल म्हणून तो (लेखक) या किंवा त्या विषयाकडे वळेल...काही पक्षी खडे खातात ते त्यांच्या साह्याने अन्नपचन होते म्हणून, ते त्यांना आवडतात किंवा पचतात म्हणून नव्हे... याच्या उलट, साहित्य हा समीक्षकाचा ध्यास असतो...यांच्या मनात साहित्यविषयक समस्या आहेत, साहित्यविषयक जिज्ञासा आहे, त्या संदर्भात एक अस्वस्थता आहे...ही अस्वस्थता त्यांना समीक्षालेखनास प्रवृत्त करते. त्यांची समीक्षा त्यांच्या समग्र व्यक्तिमत्त्वाचा हुंकार असतो...साहित्याच्या आस्वादातून साहित्याच्या निर्मितिप्रक्रियेपर्यंत पोहोचण्याची त्यांना निकड असते' (प्रतीतिभेद : ६/७), असे त्यांनीच

म्हटले आहे. समीक्षेची निर्मितिप्रक्रियाच त्यांनी इथे उलगडली आहे. तीच त्यांच्याही समीक्षेची प्रक्रिया होती.

या विवेचनातून त्यांनी समीक्षकांचे प्रकार ठरवले आहेत : 'निबंधकार समीक्षक' व 'सर्जनशील समीक्षक'. यातील पहिल्या प्रकारात त्यांनी डॉ. रा. शं. वाळिंबे, डॉ. रा. भा. पाटणकर, प्रा. म. वा. धोंड यांचा समावेश केला; तर दुसऱ्या प्रकारात श्री. के. क्षीरसागर, दि. के. बेडेकर, कुसुमावती देशपांडे, वा. ल. कुलकर्णी, गंगाधर गाडगीळ यांचा समावेश केला होता. खरे तर ही वर्गवारी आस्वादप्रधान, आकलनसापेक्ष होती. त्यात हेवा किंवा द्वेष नव्हताच. 'हे निबंधकार आपल्या बौद्धिक व्यायामासाठी विषयाचा वापर साधने म्हणून करतात. विषयाचा फडशा पाडून झाला की त्यापासून वेगळे होतात', अशी टीकाही त्यांनी केली आहे. यापेक्षा एक तिसरा समीक्षकांचा वर्ग ते मानत- 'प्रक्षुब्ध समीक्षक'. यात त्यांनी वि. का. राजवाडे, बा. सी. मर्ढेकर व भालचंद्र नेमाडे यांचा समावेश केला होता. अर्थात या तिसऱ्या वर्गवारीबद्दल त्यांनी कुठे स्वतंत्र लिहिल्याचे आठवत नाही. मात्र, माझ्या एम. फिल.च्या प्रबंध-रूपरेषेसाठी त्यांनी पहिले प्रकरण हेच सुचवले होते. माझा विषय 'भालचंद्र नेमाडे यांचा साहित्यविचार' असा होता. तेव्हा पूर्वपक्ष म्हणून 'अभ्यासक समीक्षक' व सर्जनशील समीक्षक' असे विवेचन करून नेमाडे हे 'प्रक्षुब्ध समीक्षक' कसे आहेत ते सांगावे अशी ही रूपरेषा होती. 'मराठी साहित्यविचार व व्यवहाराला नवे वळण या प्रक्षुब्ध निबंधांनी व लेखकांनीच लावलेले आहे. अशा निबंधांचे तुम्ही संपादन करा', असेही ते म्हणत.

ही त्यांची वर्गवारी म्हणजे मराठी समीक्षेच्या परंपरेची व्यवस्थिती होती. मराठी कवितेत जशा दोन परंपरा त्यांनी सांगितल्या तशा मराठी समीक्षेच्या तीन प्रवृत्ती आहेत, हे त्यांचे सूत्र खरेच महत्त्वाचे होते. 'सर्जनशील समीक्षा समजून घ्यायची असेल तर तुम्ही कुसुमावती, मर्ढेकर, वा. ल., गाडगीळ वाचा', असे ते म्हणत. दभि स्वत: याच परंपरेतील समीक्षक होते. काखेत त्या वेळी जे पुस्तक असेल तेच विचार व तत्त्वे त्या वेळच्या आस्वादाला लावणे त्यांना मान्य नव्हते. रा. भा. पाटणकर यांच्या समीक्षेबद्दल त्यांचे असेच मत होते. माडखोलकर, कमल देसाई, मुक्तिबोध व अपूर्ण क्रांती या पाटणकर यांच्या ग्रंथाकडे पाहिले की त्यात स्वअभिरुचीचा शोध दिसत नाही; परस्पर अभिरुची असणारे लेखक एकाच वेळी कसे आवडू शकतात, असा दभिंचा आक्षेप होता. सर्जनशील समीक्षकाची पुढची समीक्षा त्याच्या आधीच्या लेखनाचा विस्तार असतो किंवा पुढचा शोध तरी असतो किंवा नवे आकलन असते, असावे असे ते मानत. त्यामुळेच ज्ञानेश्वर-तुकाराम, मर्ढेकर, म. म. देशपांडे हे कवी; मोहन राकेश, पु. शि. रेगे हे कादंबरीकार या त्यांच्या आवडीच्या लेखकांवर ते वारंवार पण दरवेळी नवे लिहीत असत.

त्याच त्या कलाकृती व त्याच लेखकाचे पुढचे आकलन ते मांडत असत. त्यामुळे 'सावित्री' व 'रणांगण' या कादंबऱ्यांवर, पु. शि.-बेडेकर-जी.ए. या लेखकांवर त्यांनी वारंवार लिहिले. 'सुरेश भट : नवे आकलन', 'अनन्यता मर्ढेकरांची' हे ग्रंथ; किंवा 'कणा', जोगिया' अशा कविता;

**आस्वादाशी प्रामाणिक राहून आपल्या प्रतीतीचा दरवेळी नव्याने शोध घेत, तिला कठोरपणे तपासत त्या त्या प्रतिभावंताच्या व्यक्तिमत्त्वाचा वेगवेगळ्या पार्श्वभूमीवर व संदर्भात शोध घेत ते लिहीत असत. हे त्यांच्या सर्जनशील समीक्षेचे असाधारण वैशिष्ट्य होते. अशी समीक्षा मराठीत दभिंनीच लिहिली. एरवी मराठी समीक्षा विषयवारीने, लेखकानुसारी व ग्रंथानुसारी असते. दभिंनी तिला प्रतीतिनिष्ठ केले, अभिरुचिनिष्ठ केले हे त्यांचे मराठी समीक्षेला योगदान होय.**



नेमाडे यांच्या कादंबऱ्या, यांच्यावर नवे नवे भाष्य ते करत राहिले. आस्वादाशी प्रामाणिक राहून आपल्या प्रतीतीचा दरवेळी नव्याने शोध घेत, तिला कठोरपणे तपासत त्या त्या प्रतिभावंताच्या व्यक्तिमत्त्वाचा वेगवेगळ्या पार्श्वभूमीवर व संदर्भात शोध घेत ते लिहीत असत. हे त्यांच्या सर्जनशील समीक्षेचे असाधारण वैशिष्ट्य होते. अशी समीक्षा मराठीत दभिंनीच लिहिली. एरवी मराठी समीक्षा विषयवारीने, लेखकानुसारी व ग्रंथानुसारी असते. दभिंनी तिला प्रतीतिनिष्ठ केले, अभिरुचिनिष्ठ केले हे त्यांचे मराठी समीक्षेला योगदान होय.

यामुळे एक झाले- ज्या वाचकांचे हे लेखक व त्या साहित्यकृती आवडीच्या होत्या ते दभिंचे चाहते झाले. समीक्षेला त्यांनी असे लोकप्रिय बनवले; अभ्यासकाच्या मैफिलीतून सामान्य माणसांच्या ओसरीपर्यंत नेले. क्षीरसागर-पाटणकर यांच्या ग्रंथांचे असे झाले नाही, ते विद्वज्जनांच्या ग्रंथालयातच राहिले. ज्ञानेश्वरांवरच तर दभिंनी

किती तरी वेगवेगळ्या पैलूंनी लिहिले. हा त्यांच्या विमलप्रज्ञेचा आविष्कार होता. या शोधात दरवेळी ते नवे व अपूर्व आकलन मांडत असत. उदा. ज्ञानेश्वरांच्या सर्व साहित्यात एक संवादयुग्म आहे; ज्ञानेश्वरीत गुरु-शिष्य संवाद, चांगदेव पासष्टीत मित्रसंवाद, अभंगात लोकसंवाद व अमृतानुभवात आत्मसंवाद आहे, हे त्यांचे असेच नवे आकलन. किंवा 'अकार चरण युगुल। उकार उदर विशाल। मकर महामंडल। मस्तकाकारे' या ओवीत ओंकाररूप गणेशाचे दृश्यरूप कसे आहे यासाठी त्यांनी ज्ञानदेवांचा ॐ हा असा आडवा नसून उभा (ॐ) आहे हे सांगितले. 'अकार' म्हणजे गणेशाचे दोन पाय, 'उकार' म्हणजे उदार-पोट व 'मकार' म्हणजे मस्तक होय. 'शब्दरूप' ॐमध्ये ज्ञानदेवांना दृश्यरूप गणेशाचा साक्षात्कार कसा होतो, हे त्यांचे विवेचनही अपूर्व व मौलिक होय (ज्ञानेश्वरांचे श्रोतृसंवाद). त्यांच्याआधी हे कोणी सांगितले नाही. इतरांचे जे वाचले ते दभि सांगत नसत, ते ज्ञान पचवून त्या आधारे जे कोणालाच जाणवले नाही ते असे ते पहिल्यांदा सांगत असत. शिवाय ते सोप्या, ओघवत्या, चिंतनपर व रसरसत्या जिवंत शैलीने सांगत. त्यांचा 'पस्तुरी' (२००२) हा ग्रंथ याची साक्ष आहे. सामान्य व विदग्ध अशा दोन्ही वाचकांना तो आकृष्ट करतो. सोपेपणा आणि रसाळपणा- साच आणि मवाळ, मितले आणि रसाळ अशी विरुद्ध वैशिष्ट्ये त्यांच्या या लेखनात एकत्र दिसतात.

तीच गोष्ट 'हिमवंतीची सरोवरे' (१९९६) या ग्रंथाची. हा ग्रंथ संपादित लेखांचा असल्याने 'बेस्ट ऑफ दभि' असा आहे. चित्रे, मुक्तिबोध, तांबे, तुकाराम, महाकाव्य, मुक्तछंद असे कवितेवरील; तसेच 'बंदूक आणि देवदास', 'तिसऱ्यांदा रणांगण', 'स्वामी' आणि 'कादंबरी समीक्षा' हे कादंबरीवरील व 'युगदर्शन' हा समकालीन साठोत्तरी साहित्यप्रवाहातील प्रवृत्तिविशेषांवरील लेख हे महत्त्वाचे व एकदम नवी मांडणी करणारे आहेत. 'युद्धोत्तर काळातील मराठी संवेदनशीलतेचे दर्शन चित्रे, कोलटकर, नेमाडे, ग्रेस यांच्या साहित्यातून दिसते', 'वीरयुगात महाकाव्ये निर्माण होतात, आज वीरयुग नाही म्हणून महाकाव्ये निर्माण होत नाहीत', 'नाट्यकलेत संवेदना असूनही त्या स्वयंभू म्हणून वावरत नाहीत', 'स्वामी' कादंबरीत कसलीच व्यामिश्रता नाही', 'कादंबरीत कथातत्त्व-घटनांची काळानुसार जुळणी आणि कथाबंध-घटनांमधील कार्यकारणभाव ही दोन तत्त्वे असतात', 'मुक्तिबोधांच्या काव्यात समाजविरह आणि आत्मकेंद्रितता हे दोन ध्रुव आहेत'... अशी या ग्रंथात नोंदवलेली निरीक्षणे दभिंच्या मर्मज्ञतेची द्योतक आहेत.

जाडजूड ग्रंथ व पांडित्यपूर्ण विवेचन अशा निर्मितीपेक्षा टिपणवजा ठिणगीसारख्या स्फुट समीक्षेतूनच दभि आपले आकलन मांडत राहिले. मर्ढेकर-कुसुमावती, गाडगीळ यांनीही तर तेच केले होते. अरुण जाखडे, अक्षयकुमार काळे म्हणायचे, "सरांनी एकेका विषयाला धरून ग्रंथ लिहावे." मी हे सरांना सांगितल्यावर ते म्हणाले, "मी ते काम 'महाकाव्य : स्वरूप आणि समीक्षा', 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र : पुन:स्थापना', 'दोन परंपरा', 'नाटक : स्वरूप आणि समीक्षा', 'कादंबरी : स्वरूप आणि समीक्षा' या ग्रंथांतून केले आहेच. आता आस्वादातून तत्त्वाचा शोध सांगणे जास्त गरजेचे आहे." अर्थात यातील पहिले तीन ग्रंथ सोडले तर बाकी ग्रंथ म्हणजे लेखसंग्रह आहेत, फक्त ते एका साहित्यप्रकारावरचे आहेत इतकेच. म्हणजे त्यातही तत्त्व-सूत्र आणि मग विवेचन असे नाहीच. भराभर बाह्यसंदर्भ देऊन ग्रंथाचे वजन वाढवण्यापेक्षा आपल्या अनुभूतीशी प्रामाणिक राहूनच लेखक-कलाकृतीच्या नवनव्या सत्याचा व सत्त्वाचा शोध घेत राहणे, हा त्यांच्या समीक्षेचा गुण होता. पण त्यामुळे प्रकल्पवजा काम त्यांच्या हातून घडले नाही. विशेषत: 'ज्ञानेश्वर-तुकाराम : आंतरिक अनुबंध' हा एक प्रकल्प त्यांना करावयाचा होता. शिवाय 'वाङ्मयीन सापेक्षतावाद' हा नवा साहित्यसिद्धांत त्यांना मांडावयाचा होता. या दोन्ही गोष्टींना मराठी वाचक मुकलाच. नाही म्हणायला त्यांनी 'नवअलौकिकतावादा'ची मांडणी केली आहे; मात्र, तीही स्फुट लेखांतूनच झाली आहे.

३.

डॉ. श्यामला मुजुमदार यांनी 'अलौकिकतावाद आणि नवअलौकिकतावाद' या (नवभारत, मार्च-एप्रिल, २०१०) तसेच 'नवअलौकिकतावादाचा प्रारंभ- दभि' (समीक्षेची क्षितिजे, २०१०) या लेखांतून दभिंच्या नवअलौकिकतावादाची मांडणी केली आहे. नवअलौकिकतावादात दभिंनी अभिनवगुप्ताच्या 'व्यंग्यार्थ' व मर्ढेकरांच्या 'घाट-लय' सिद्धांताची सांगड घातली आहे. त्यासाठी त्यांनी 'साहित्यकृतीतील अर्थव्यूह' ही संकल्पना मांडली आहे. साहित्यकृतीत व्यंग्यार्थ असतो म्हणजे काय, तर तिच्यात 'अर्थाचा अर्थ' असतो. तिच्या आस्वादातून रसिकाला अर्थसमृद्धी मिळते, असे अभिनवगुप्त म्हणतात; तर साहित्यकृतीत आशय लयतत्त्वातून घाटाचे रूप धारण करतो, असे मर्ढेकर म्हणतात. आता अभिनवगुप्त म्हणतात त्या 'अर्थाचा स्फोट' (व्यंग्यार्थ) व मर्ढेकर म्हणतात ते आशयाला 'संघटनारूप प्राप्त होणे' (घाट) यांची जुळणी कशी करायची? तर त्याची उकल दभिंनी 'व्यूह' या संकल्पनेने केली. हाच त्यांचा नवअलौकिकतावाद.

'संपूर्ण कलाकृतीत व्यंग्यार्थ सुटा व विस्कळीत नसतो;

तिच्यात व्यंग्यार्थाचा एक व्यूह असतो. तो शब्द, अलंकार, प्रतिमा, प्रतीक यांतून साकारला जातो. या लहान लहान घटकांचे अनंत व्यूह साहित्यकृतीत जिवंत असतात. त्यातून रसिकाला नवीन अर्थ भावतो. त्याचा एक मोठा व्यूह होतो. म्हणून साहित्यकृतीची भाषा ही व्यूहाची भाषा आहे. व्यंग्यार्थात हे जे अनंत व्यूह असतात ते मात्र मर्ढेकर मानतात तसे केवळ संवाद, विरोध, समतोलात्मक नसतात. या व्यूहांचे एक ऊर्जाकेंद्र असते. मात्र, ते साहित्यकृतीच्या केंद्रस्थानी नसते, ते कलाकृतीत कुठेही असते. केंद्रापासून घाटापर्यंत साहित्यकृतीच्या परिसरात लयतत्त्व कार्य करते. लयतत्त्वाला या ऊर्जाकेंद्रातूनच आकृती (घाट) मिळते. अशा प्रकारे साहित्यकृतीत आशयाची संघटना असते, निव्वळ आकृतीची नाही.' (श्यामला मुजुमदार, नवभारत, मार्च-एप्रिल, २०१०: ४१ ते ५४)

अशा व्यूहात्मक साहित्यकृतीचे तत्त्व दभिंनी आपल्या नवअलौकिकतावादातून मांडले आहे. 'अभिनवगुप्ताने मर्ढेकरी सौंदर्यशास्त्र अभ्यासणे शक्यच नव्हते, पण मर्ढेकरांना भारतीय साहित्यशास्त्र अभ्यासणे सहज शक्य होते. ते त्यांनी केले असते, तर साहित्यकृतीतील 'आशयसापेक्ष व्यंग्यार्थ' व 'आकृतिसापेक्ष लय' यांचा पेच सुटला असता. मर्ढेकर भारतीय साहित्यशास्त्रातील अलौकिकतावादाकडे वळले असते तर प्रसरणशील अर्थ, लय, सौंदर्य व जीवनमूल्ये यांच्या यथार्थ संबंधाचे चित्रही त्यांना नेमकेपणाने उभे करता आले असते. त्यांच्या लयाश्रित सौंदर्यशास्त्राला नवी विविध परिमाणे प्राप्त झाली असती' (मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र : पुन:स्थापना, प. आ.), असे दभिंनी म्हटले आहे. त्यामुळे मर्ढेकरी सौंदर्यशास्त्रात असलेली उणीव दभिंनी नवअलौकिकतावाद मांडून दूर केली आहे. त्यांनी अभिनवगुप्त व मर्ढेकर दोन्ही अभ्यासून त्यांचा समन्वय साधला आणि समीक्षेतील कलावाद-जीवनवाद, अलौकिकतावाद-नवअलौकिकतावाद हा पेच सोडवण्याचा प्रयत्न केला. इथे दभिंचे मर्ढेकरांशी मतभेद आहेत. मात्र, ते नोंदवून मर्ढेकरांच्या सौंदर्यशास्त्रावरील 'आकृतिवादा'च्या आरोपाला त्यांनी उत्तरही दिले आहे.

या सिद्धांतातून दभिंनी जीवनमूल्ये व कलामूल्ये यांचे एकत्रीकरणही केले तसेच भारतीय साहित्यशास्त्र व पाश्चात्त्य सौंदर्यशास्त्र यांचा समन्वयही साधला. अभिनवगुप्त आणि मर्ढेकर यांच्या पुढची वाट ज्या अलौकिकतावादात दभिंनी सांगितली त्याचे विवेचन 'मर्ढेकर आणि अभिनवगुप्त' (अनन्यता मर्ढेकरांची, २००९) या लेखातही दिसते. मर्ढेकरांनी सर्व कलांचे सौंदर्यशास्त्र सांगितले, तर अभिनवगुप्ताने साहित्यकलेचे. दभि मात्र अभिनवगुप्ताचे व्यंग्यार्थाचे तत्त्व इतर कलेला लावून पाहतात आणि व्यंग्यार्थाला सौंदर्यकलेच्या प्रांतात नेतात. हे त्यांचे मौलिक योगदान आहे. त्याकडे नीट लक्ष दिले पाहिजे. ते म्हणतात, 'साधारणीकृत अनुभवालाच 'व्यंग्यार्थ' अशी संज्ञा आहे. हा व्यंग्यार्थ जसा शब्दांतून प्रकटतो तसा तो संगीतातील स्वर, नृत्यातील गती, नाट्यातील अभिनय यांतूनही प्रकटत असतो' (अनन्यता मर्ढेकरांची : २१). इथे दभि अलौकिकतावादातील व्यंग्यार्थाला आपल्या नवअलौकिकतावादातील व्यूह संकल्पनेशी जोडून घेतात, त्याच वेळी मर्ढेकरी सौंदर्यकल्पनेला व्यंग्यार्थाशी जोडून घेतात. अलौकिकतावाद व मर्ढेकरी सौंदर्यविचाराचा हा समन्वय आहे. तोच नवअलौकिकतावाद होय. 'अभिनवगुप्त व्यक्तिविशिष्टता सोडावयास सांगतो, तर मर्ढेकर जीवशास्त्रीय भूमिका सोडावयास सांगतात. तपशील भिन्न असला तरी या दोन्ही भूमिका एकाच प्रक्रियेचे प्रतिपादन करीत आहेत' (अनन्यता मर्ढेकरांची : २१), असे म्हणून दभिंनी पौर्वात्य अलौकिकतावादाला पाश्चात्त्य सौंदर्यविचारांशी जोडून आशयवादी व आकृतिवादी साहित्यसिद्धांताचा पेच सोडवला आहे.

दभिंचा हा 'नवअलौकिकतावाद' हा रा. भा. पाटणकरांच्या 'द्विधृवात्मकतेच्या सिद्धांता'च्या पुढचे विवेचन होते. पण पुन्हा तेच, की पाटणकरांनी हा विचार 'सौंदर्यमीमांसा' या ग्रंथातून मांडला, तर दभिंनी स्फुट लेखातून. त्यामुळेच त्यांच्या हयातीत याची नीट दखल घेतली गेली नाही. शिवाय मर्ढेकरी सौंदर्यशास्त्रावरच्या 'आकृतिवादी' या आक्षेपाला नीट दिलेला पर्यायही समोर आला नाही. मर्ढेकरी सौंदर्यशास्त्रातील ही उणीव दूर न झाल्याने पुढे केवळ आशयवादाचे पीक आले. देशीवादाचा पर्याय स्वीकारला गेला. मात्र, देशीवादातही सांस्कृतिक आकृतिबंधाचे विवेचन आहे, साहित्यशास्त्रीय नाही. त्यामुळे रूपबंधाचा प्रश्न कायम राहिला आहे. म्हणूनच नेमाड्यांनाही पुढे जाऊन 'रूपाचे भान हरवले आहे' अशी तक्रार करावी लागली, ती लागली नसती. कारण दभिंच्या नवअलौकिकतावादात आशय व रूप या दोन्हींचेही स्पष्टीकरण सापडते. फक्त त्याची नीट तात्त्विक व प्रबंधवजा मांडणी होणे गरजेचे होते. दभिंनी 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र : पुन:स्थापना' या आपल्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीच्या मलपृष्ठावरच याची प्रस्तावना व गरज बोलून दाखवली आहे.

दभिंनी अनेक समीक्षालेखांतून या नवअलौकिकतावादाचे उपयोजनही केले. दभि म्हणतात, 'दर्शनी अर्थाशिवाय आणखी काय असते कवितेत? दर्शनी अर्थातून निघणारे अर्थझंकार असतात, त्या अर्थझंकाराचे

चपळ आणि परिवर्तनशील व्यूह असतात, अशा व्यूहांची मिटती-उमलती केंद्रे असतात. एवढेच नव्हे, तर सलग जीवनपटातून त्या कवितेने स्वत:चे रूप वेगळे काढलेले असते' (पस्तुरी : १२). इथे दभिंनी आपल्या नवअलौकिकतावादाचे उपयोजनच केले आहे. यात अर्थ (व्यंग्यार्थ), स्वत:चे रूप (घाट), अर्थझंकार (व्यूह) या तिन्ही संकल्पनांचे स्पष्टीकरण आले आहे. असेच उपयोजन त्यांच्या 'बंधछाया आणि कणा' (पस्तुरी) या लेखातही आहे. मात्र, सलग व प्रकरणत: तात्त्विक विचार न मांडल्यामुळे त्यांच्या उपयोजित समीक्षेतच या वादाचे व्यूह शोधावे लागतात. त्यामुळे त्यांच्या स्फुट व उपयोजित समीक्षेतून त्यांची सैद्धांतिक तत्त्वे व संकल्पना शोधून समोर आणणे ही मोठी जबाबदारी पुढील अभ्यासकांवर आहे. मात्र, हा सिद्धांत म्हणजे त्यांनी मराठीला दिलेले मौलिक योगदान आहे एवढे मात्र नक्की.

४.

नवअलौकिकतावादाप्रमाणेच दभिंच्या 'वाङ्मयीन सापेक्षतावाद' या सिद्धांताचाही असाच शोध घ्यावा लागेल. हा सिद्धांत मला मांडावयाचा आहे, असे ते म्हणत; पण त्यांनी त्याबद्दल कुठे लिहिल्याचे दिसत नाही. त्याचेही कण कुठे तरी त्यांच्या चाळीस ग्रंथांतील समीक्षेत विखुरले असणारच. त्यांनी प्रबंधवजा लिहावे असे म्हटल्यावर ते म्हणत, ''मर्ढेकर, मुक्तिबोध यांनी लय व मानुषता हे सिद्धांत लेखरूपानेच मांडले आहेत. पुढच्या अभ्यासकांनी त्याचे विवेचन केले, तसे ते माझेही करतील. मी समीक्षेत काय काम केले आहे ते मी व माझे विद्यार्थी जाणतात. इतरांना ते पन्नास वर्षांनंतर कळेल. ज्ञानेश्वरांना सातशे व तुकारामांना तीनशे वर्षे जावी लागली, माझ्यासाठी पन्नास काही फार नाही.'' हा त्यांचा अहंकार नव्हता, ती आत्मभानाची खूण होती. आपल्या आत्मचरित्रवजा अशा ग्रंथातही ते म्हणतात, 'प्रबंधात्मक लेखनामध्ये मुख्यत: बौद्धिक शक्ती कार्यरत असते. त्यात संशोधन असते पण समीक्षा नसते...माझा पिंड समीक्षकाचा; संशोधकाचा, ग्रंथकाराचा नव्हे' (अपार्थिवाचा यात्री : ९७).

असे असूनही दभि पीएच.डी.साठी महाकाव्य या साहित्यप्रकाराच्या अभ्यासाकडे का वळले? त्याचे कारण तत्कालीन मराठी अभिरुची व साहित्यनिर्मितीच्या प्रेरणांमध्ये आहे. ते म्हणतात, 'अर्वाचीन मराठी अभिरुची भावकाव्यप्रधान आहे. तिने कादंबरीवरही आक्रमण केले आहे. ते दूर झाले पाहिजे. मराठी साहित्याभिरुची व्यापक झाली पाहिजे, या उद्दिष्टाने प्रेरित होऊन मी महाकाव्याकडे वळलो होतो. दुर्दैवाने अजूनही मराठीत महाकाव्यात्मक कादंबरी निर्माण झालेली नाही. अजूनही मराठी कादंबरीची निर्मितिप्रेरणा आत्मचरित्रात्मक आहे, भावकाव्यात्मक आहे...मर्ढेकरांच्या एका लेखाने मराठी वाङ्मयाभिरुची परिष्कृत झाली. माझ्याही प्रबंधाचा एक दिवस परिणाम होईलच.' (अपार्थिवाचा यात्री : १०६)

आपले लेखन-वाचन-संशोधन ही खासगी व वैयक्तिक बाब नसते, ती लेखकाची सामाजिक-सांस्कृतिक जबाबदारी असते, हे खोल भानच यातून दिसते. तसेच मराठी कादंबरी आत्मचरित्रात्मक व भावकाव्यात्मक असून ती महाकाव्याच्या तोडीला गेली पाहिजे असे त्यांना वाटत होते. मात्र, त्या तोडीला नेऊ शकणारे आजचे लेखक त्यांना भालचंद्र नेमाडे वाटत असावेत. पण ते म्हणत, की 'नेमाड्यांना महाकाव्य लिहायचे आहे की प्रतिकादंबरी?' याचे उत्तर त्यांना बहुधा 'हिंदू'नंतर मिळाले असेल. 'पद्मगंधा'च्या दिवाळी (२०१५) अंकात त्यांनी नेमाड्यांवर लेख लिहिला आहे. त्यात म्हटले आहे, की नेमाडे यांची कादंबरी कड्यावरून कोसळणाऱ्या प्रपातासारखी आहे... नेमाड्यांची 'भावकाव्यात्मता' नाडीच्या ठोक्याप्रमाणे टप्याटप्याने प्रकटते' (पृ. २२). याचा अर्थ महाकाव्य (एपिक), भावकाव्य (लिरिक) आणि नाट्यात्मक (ड्रॅमॅटिक) अशा तीन साहित्यगुणांपैकी भावकाव्यात्मता हा गुण नेमाडे यांच्या कादंबऱ्यांत आहे. त्यामुळे १९६४ पासून कादंबरी साहित्याबद्दल असमाधानी असणाऱ्या दभिंना त्यांच्या रूपाने आश्वस्त करणारा कादंबरीकार गवसला असावा, असे म्हणता येते. अशा प्रकारे त्यांची समीक्षा अर्थनिर्णयनाबरोबरच लेखकाच्या प्रवृत्तीचे स्वरूप व साहित्यपरंपरेत लेखकाचे स्थानही ठरवत असे.

५.

सर्जनशील समीक्षकाच्या आस्वादक व उपयोजित समीक्षेत त्याची सैद्धांतिक तत्त्वे असतात. मर्ढेकरांचा लय, मुक्तिबोधांचा मानुषता, नेमाड्यांचा देशीवाद हे सिद्धांत त्याचे उदाहरण होय. दभिंच्या लेखांतून अशीच सिद्धांततत्त्वे आपल्याला सापडतात. संशोधनपर ग्रंथाच्या शेवटी जशी विषय, संज्ञा-संकल्पना सूची असते, तशी या समीक्षाग्रंथालाही असती तर त्यांचा सहज-शोध लागला असता. समीक्षेची अशी किती तरी तत्त्वे दभिंच्या लेखनात दडलेली आहेत. उदा. 'संभवाचा सिद्धांत', 'लिरिकल क्वालिटी व विश्ववात्सल्य', 'अवास्तव आणि अद्भुत', 'प्रदेशनिष्ठ कथेची प्रकृती', 'भाषिक संवेदनशीलता', 'शब्दभ्रम व अर्थभ्रम' (प्रतीतिभेद); 'केशवसुत संप्रदाय', 'कवीचे स्वातंत्र्य', 'कवीचा आत्माविष्कार', 'कवीची क्लृप्ती', 'सामाजिक उत्तरदायित्व' (दोन परंपरा), 'कविता

आणि गूढता', 'अनुभूतीची भाषांकितता', 'अन्यूनअतिरिक्तता', 'वस्तुनिष्ठ नवनिर्मिती' (अनन्यता मर्ढेकरांची) ही त्याची काही उदाहरणे होत. खरे तर अशा ग्रंथांच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळी तरी अशी सूची शेवटी जोडली जावी, जेणेकरून त्यांच्या समीक्षेतील नवी तत्त्वे गवसतील.

जी. ए. कुलकर्णी यांच्या कथांचे सामर्थ्य सांगताना दभि म्हणायचे, 'त्यांच्या कथेत उपकथानके आणि अनेक कथांची बीजे दडलेली आहेत. त्यामुळे जीएंच्या एकेका कथेत अनेक कवींचे कवितासंग्रह व कथाकारांचे कथासंग्रह विसर्जित झाले आहेत.' हीच गोष्ट दभिंच्या समीक्षेबद्दलही म्हणता येते. त्यांच्या एकेका समीक्षालेखात साहित्याच्या स्वरूपाविषयीची, साहित्याच्या निर्मितिप्रक्रियेविषयीची, लेखकाचे व्यक्तिमत्त्व व प्रतिभेविषयीची तत्त्वे दडलेली आहेत. मात्र, ती त्यांनी वाचलेल्या ग्रंथातील किंवा इतर लेखकांची नव्हेत; त्यांना आस्वादातून गवसलेली ही तत्त्वे होत. त्यांच्या कोणत्याही लेखातील काही विधाने आपण नीट न्याहाळली, तर आस्वादातूनच साहित्यकृतीचे स्वरूप व साहित्यकृतीचे परंपरेतील स्थान ठरवणे, लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेणे, साहित्यकृतीचे अर्थनिर्णयन करणे, वाचकांच्या अभिरुचीचा विकास करणे, ही समीक्षेची सर्व उद्दिष्टे साध्य झालेली दिसतात. उदाहरणार्थ- 'कवितेतील हा अर्थही गोठल्यासारखा नसतो तर गतिशील असतो, तो एकदिशानुगामी नसतो; त्याचे प्रसरणशील व्यूह असतात. म्हणून तर कवितेला अर्थनृत्य म्हणतात' (पस्तुरी : ६७). 'मर्ढेकर हे शतकातील सर्वश्रेष्ठ कवी..(कारण) त्यांनी साहित्येतर ललित कलाकृतीप्रमाणे भावकवितेला वस्तुनिष्ठ अस्तित्व मिळवून दिले. मराठी भावकविता कवीच्या लौकिक व्यक्तिमत्त्वाशी बांधली गेली होती. तिला त्यांनी कविनिरपेक्ष अस्तित्व मिळवून दिले' (पस्तुरी : १०९). 'लेखनातील भावानुभूती प्रत्ययपूर्ण (आत्मनिष्ठ), अनेकसंदर्भसूचक (तादात्म्ययुक्त) आणि विश्वाच्या गाभ्याला हात घालणारी (महात्मता) असेल तर ते लेखन आपोआपच 'वाङ्मय' होणार' (पस्तुरी : १२०). 'महाकाव्य, नाट्य आणि कादंबरी हे भावकाव्यापेक्षा किती वेगळे आणि वरचढ वाङ्मयप्रकार; पण परिभाषाविमुखतेमुळे आणि रोमँटिक आणि रोमँटिसिस्ट प्रभावामुळे याचे आज आपणास विस्मरण होत आहे' (समीक्षेची वल्कले : ७०). 'खांडेकर-कुसुमाग्रजांच्या काळात मराठीत जी रूपककथा आणि जी गद्यगीते लिहिली गेली ती विचारकविताच होती; पण तिचा तेव्हा नीट विकास झाला नाही; कल्पकतेचा हव्यास, तत्सम भाषेचा सोस, मुक्त चिंतनाऐवजी अध्यात्म इत्यादी मर्यादांमुळे तो कुंठित झाला' (समीक्षेची वल्कले : ७०). '(ज्या) लेखनामागील निर्मितिप्रक्रिया मनोविकृतीशी निगडित असते अशा लेखनाचा उपयोग मानसशास्त्रज्ञांना असतो, समीक्षक किंवा रसिक यांना नसतो; कारण तिथे कलानिर्मिती किंवा विचारनिर्मिती झालेलीच नसते, फक्त आत्माविष्कार झालेला असतो..लेखनामागील निर्मितिप्रक्रिया शोधायला लेखकाच्या घरी जावे लागत नाही, ती प्रत्यक्ष लेखनातच उपस्थित असते.' (समीक्षेची वल्कले : १३९)

ही काही दभिंची समीक्षा-सुभाषिते नव्हेत. ती नुसती निरीक्षणेही नाहीत, तर ती प्रमेये-हायपोथिसिस आहेत. तीत पुढील संशोधनाची बीजे आहेत. त्यांच्या अशा एकेका विधानामधून काव्य-कादंबरी, आत्मचरित्र असे साहित्यप्रकाराचे स्वरूप, मर्ढेकर- खांडेकर-कुसुमाग्रज यांच्या प्रतिभेचा व कार्याचा शोध, मराठी अभिरुची व साहित्यनिर्मिती यांचा परस्परसंबंध व निर्मितीच्या मर्यादा, लेखकाची निर्मितिप्रक्रिया, वाचकाची अभिरुची यांचा शोध- अशी सूत्रे-प्रमेये सापडतात. आज विद्यापीठांमधून तेच ते विषय पीएच. डी.साठी दिले जातात. त्यांना नवीन विषय पाहिजे असल्यास दभिंच्या अशा दडलेल्या प्रमेयातून निवड करावी. म्हटले ना, की त्यांच्या समीक्षेत अनेक संशोधकांचे प्रबंध विसर्जित झाले आहेत.

एकापरीने दभिंनी प्रबंधवजा समीक्षाग्रंथ लिहिले नाही ते बरेच झाले; नाही तर इतकी सूत्रे नंतरच्या पिढीला गवसली नसतीच. मराठी साहित्यव्यवहार, मराठी अभिरुची, लेखकप्रतिभा त्याचे व्यक्तिमत्त्व व लेखनप्रवृत्ती, मराठी परंपरा, साहित्यप्रकारांचे स्वरूप, त्यांच्या निर्मितीमागच्या प्रेरणा, साहित्याची निर्मितिप्रक्रिया, लेखकाच्या व साहित्यकृतींच्या मर्यादा आणि त्यामागची कारणे, प्रतिभावंताच्या व्यक्तिमत्त्वावर पडलेला प्रभाव, त्याने केलेले अनुकरण यातून त्याच्या साहित्याला प्राप्त झालेले वैशिष्ट्य व मर्यादा, तत्कालीन सामाजिक-सांस्कृतिक घटना-घडामोडी व त्यांचे साहित्यात पडलेले प्रतिबिंब- अशा विविधांगी पद्धतीने दभिंनी आपल्या समीक्षेचे दालन व्यापले आहे. त्याचा नीट अभ्यास व विस्तार होणे गरजेचे आहे.

सरांचे विद्यार्थी पुरुषोत्तम माळोदे यांच्या 'विदग्ध प्रतिभावंत : विश्राम बेडेकर' या ग्रंथाचे नागपूरला प्रकाशन होणार होते. बेडेकर आवडते लेखक व माळोदे आवडता विद्यार्थी असल्याने १२ ऑगस्ट २०१५ चे हे निमंत्रण त्यांनी स्वीकारले. कुठेही नवीन व्याख्यान द्यायचे असेल तर ते फोन करायचे. त्यात ते काय नवीन मुद्दे मांडणार ते आधीच सांगायचे. मला ते म्हणाले, की 'बेडेकर व मर्ढेकर यांच्या

काळात र. धों. कर्वे यांची लैंगिक शिक्षण व संततिनियमनाची चळवळ सुरू होती. मर्ढेकरांच्या साहित्यात जो लैंगिक मोकळेपणा व बेडेकरांच्या साहित्यात जे मुक्त स्त्री-पुरुष संबंध दिसतात, कदाचित तो या कर्व्यांच्या चळवळीचा प्रभाव असेल, असे काहीसे मी बोलणार आहे.' समकालीन संस्कृती व लेखकाची निर्मिती, त्यातील आशयाचे स्वरूप यांच्या संबंधाचा हा नवा उलगडा होता. हे त्यांनी पुढे कुठे लिहिले काय ते माहीत नाही. प्रत्यक्ष कार्यक्रमात तर ते याहून खूप वेगळे व नवीन बोलले, असे मला माळोदे यांनी सांगितले.

'बालकवींची फुलराणी' ही नुसती निसर्गकविता आहे, ती सामाजिक नाही, म्हणून होत असलेल्या टीकेलाही त्यांनी आपल्या आस्वादक समीक्षेतूनच उत्तर दिले, की त्या काळात बालविवाह, जरठकुमारी विवाहही होत असत. त्या वेळी आगरकरांची समंती विवाहाची चळवळ सुरू होती. बी कर्वीच्या 'दीपज्योतीस' या कवितेत विधवा पुनर्विवाह हा विषय आहे. फुलराणी' या कवितेतही बालकवी संमतिविवाहाबद्दलच बोलत आहेत. ज्या काळात बालविवाह व विनासंमती विवाह होत आहेत, त्या काळात बालकवी प्रेमविवाह व त्याला कुटुंबीयांची संमती, असे चित्र कवितेतून रंगवत आहेत, असे त्यांनी लिहिले. श्रेष्ठ प्रतिभावंताने आपल्या साहित्यातून सामाजिक आशय काय फक्त घोषवाक्यातूनच सांगावा, असे ते म्हणत.

६.

दभिंनी आस्वादक समीक्षा लिहिली हे खरे आहे; पण त्यांची आस्वादक समीक्षा 'मला असे वाटते' अशा तऱ्हेची नाही. ती आस्वादातून तत्त्वांचा, सूत्रांचा, प्रमेयांचा शोध घेत होती. त्यामुळेच चरित्रात्मक समीक्षेला त्यांचा विरोध होता. साहित्यकृतीच्या आकलनासाठी कलावंताच्या दाराशी जाण्याची गरज नाही, असे ते म्हणत. 'जंगल पाहणे म्हणजे जंगलात जाऊन झाडे मोजणे नव्हे' असे म्हणत आस्वादातून तपशिलाची चर्चा करणाऱ्या समीक्षेलाही त्यांनी नावे ठेवली होती. त्यामुळे म. वा. धोंड यांनी 'ज्ञानेश्वरीतील लौकिक सृष्टी'चा घेतलेला शोध त्यांना मौलिक वाटत नव्हता. तीच गोष्ट धोंड यांनी केलेल्या 'तरीही येतो वास फुलांना' या मर्ढेकरांच्या चरित्रसाधनाचा व कवितेचा अनुबंध जोडून केलेल्या समीक्षेचाही. ही समीक्षा नाही, तसेच हे संशोधनही नाही; तपशील संकलन आहे; साहित्याच्या व प्रतिभावंताच्या आकलनासाठी त्याचा यत्किंचितही फायदा नाही, असे ते सांगत. आश्चर्य म्हणजे 'तरीही येतो वास फुलांना' हे पुस्तक त्या वर्षीच्या 'ललित'च्या 'निवडक वाचक शिफारस' या यादीत वरच्या क्रमांकावर होते. मर्ढेकरांच्या साहित्याचा अन्वय त्यांचेच साहित्यशास्त्र व सौंदर्यशास्त्र यांच्या आधारे कसा लागतो, त्यासाठी चरित्राकडे जाण्याची कशी गरज नाही हे दभिंनी 'द्विदल' या ग्रंथात दाखवून दिले होते. तरीही वाचकांनी असे 'वास फुलांना..' हुंगावे हे दभिंना निश्चितच पटणारे नव्हते. त्यात भरीस भर म्हणजे विजया राजाध्यक्ष यांचे 'शोध मर्ढेकरांचा' हे पुन्हा चरित्रात्मक समीक्षेचे हे पुस्तक आले. साहित्यातील तपशील कळला तरी तो आकलनासाठी आवश्यक नसतो. संहिता, व्यक्तिमत्त्व व आस्वाद यातूनच हे आकलन शक्य होते. यासाठी लेखकाची साहित्यशास्त्रीय भूमिकाच कामी येत असते, चरित्र नव्हे, हे पुन्हा पटवून देण्यासाठी त्यांनी हिरिरीने 'अनन्यता मर्ढेकरांची' (२००९) हा ग्रंथ प्रसिद्ध केला. 'प्रसिद्ध केला' म्हणजे यातील अनेक लेख हे आधीच प्रसिद्ध झाले होते. मात्र, त्याला काही नवे लेख जोडून त्याची प्रबंधवजा मांडणी केली आहे. मर्ढेकरी साहित्याचा अन्वय लावण्याच्या अपेक्षाभंगातून ही निर्मिती झाली होती. आपली समीक्षासुद्धा बापट-पाडगावकर-करंदीकर यांच्या काव्यामुळे झालेल्या अभिरुचिभंगातून निर्माण झाली; कारण या तिघांनी मर्ढेकरांनी निर्माण केलेल्या अभिरुचीवर बोळा फिरवला, असे त्यांनी आधी म्हटले होतेच.

'अनन्यता मर्ढेकरांची' या ग्रंथातील 'मर्ढेकर व अभिनवगुप्त', 'नवीनतेचा सिद्धांत : नवे आकलन', 'मर्ढेकरांचा काव्यविचार', 'मर्ढेकरांची निर्मितिप्रक्रिया' हे लेख नीट वाचले तर दभिंनी मर्ढेकरी अन्वयार्थाला पुन्हा चारित्र्याकडून सौंदर्यशास्त्र व साहित्यशास्त्राकडे कसे जोडून घेतले आहे ते कळेल. तसेच त्यात नवअलौकिकतावाद आहे हेही कळेल. साहित्यातील तपशील हा मूल्य व तत्त्वे यांच्यासाठी असतो. समीक्षेने साहित्यातील जीवनमूल्ये व साहित्यमूल्ये शोधायची असतात, तपशील नाही, असे त्यांचे रास्त सांगणे होते. त्यामुळेच 'सर्वधारा' वा 'कवितारती'मधून येणाऱ्या माझ्या प्रत्येक समीक्षालेखावर त्यांची बारीक नजर असायची. त्यातील चांगले काय, अपुरे काय तेही ते सांगत. 'हॉस्पिटलच्या कविता आणि मराठी कवी' हा माझा 'कवितारती'तील लेख वाचून 'कवितेतील हॉस्पिटल कळले, कविता कळली नाही' असे त्यांनी म्हटले होते. वसंत आबाजी डहाके यांच्या 'मराठी साहित्य : इतिहास आणि संस्कृती' या ग्रंथावरील माझे 'ललित'मधील परीक्षण वाचून त्यात साहित्यातील संस्कृती तपशिलाला महत्त्व दिल्यामुळे ते माझ्यावर नाराज झाले होते.

आपले विद्यार्थीच नव्हे, समीक्षा लिहिणारा कुणीही साहित्यविचार व साहित्यशास्त्र यांना सोडून बोलू लागला की ते त्याला हटकत असत. त्याच वेळी अस्सल लिहिणाऱ्या

नव्या लेखकांचे ते स्वागतही करत. संतोष पद्माकर पवार, कल्पना दुधाळ यांच्या कविता जेव्हा मी त्यांना वाचून दाखवल्या तेव्हा त्याला त्यांनी दाद दिली होती. गंमत म्हणजे नागपूरला त्यांना पोस्टाने एक पाकीट आले. त्यात पत्र व कविता होती, मात्र नाव व पत्ता नव्हता. तरी त्यातील कवितेची दखल दभिंनी घेतली आणि 'या झाडाने त्या झाडांशी सलगी केली' या कवितेवर त्यांनी लिहिले तो लेख 'पस्तुरी' (१००-१०४) मध्ये आहे.

आपल्या विद्यार्थ्यांनी, विशेषत: समीक्षालेखन, संशोधन करणाऱ्यांनी मौलिक लेखन करावे (कचरा गोळा करू नये) यावर त्यांचा भर होता. त्यांच्या मार्गदर्शनाखाली जे अठरा ते वीस प्रबंध सिद्ध झाले त्या संशोधकांची नावे व विषय पाहिले तरी छाती दडपून जाते. डॉ. यशवंत मनोहर (केशवसुत व मर्ढेकर यांचे काव्य), डॉ. सदाशिव कुल्ली (जीएंची जीवनदृष्टी आणि प्रतिमासृष्टी), डॉ. विनायक तुमराम (आदिवासी साहित्य), डॉ. ज्योती लांजेवार (दलित साहित्य : स्त्रीप्रतिमा), डॉ. सुलभा हेर्लेकर (इंदिरा संत व पु. शि. रेगे-तुलना), डॉ. श्यामला मुजुमदार (ज्ञानेश्वरीतील अलौकिकतावाद), श्याम धोंड (म. म. देशपांडे), डॉ. प्रमोद मुनघाटे (१८५७चे स्वातंत्र्यसमर आणि मराठी कादंबरी), रत्नप्रभा अंजनगावकर (मराठी गद्यकाव्य), संध्या अमृते (महेश एलकुंचवारांची नाट्यसृष्टी), डॉ. निर्मला काकडे (जयवंत दळवींची नाटके : कामविकृती), डॉ. रत्नाकर डहाट ( मराठी पत्रात्मक कादंबरी), शुभांगी पातुरकर (मराठी मुक्तछंद), डॉ. वीणा मुळे-जोग (अनुवादित साहित्य) इ. यातील प्रत्येक विषय मराठीत पहिल्यांदाच व कदाचित अखेरचाच. प्रत्येक विषय स्वतंत्र. त्या निमित्ताने विद्यार्थ्यांबरोबर स्वत:ही तेवढाच अभ्यास करीत. शिवाय हे विषय देतानाही विद्यार्थ्याची अभिरुची व प्रकृती लक्षात घ्यायचे. कुणी टोकाचा असेल तर त्याला समतोल करायचे व जीवनभान द्यायचे. उदाहरण द्यायचे झाले तर कुल्ली हे मार्क्सवादी होते. त्यांना सरांनी नियतीवादी जीएंचा अभ्यास करायला लावला. मला त्यांनी 'संगीतकला आणि साहित्यकला : सौंदर्यशास्त्रीय संबंध' असा आधी विषय दिला होता. पण 'तुमचे व्यक्तिमत्त्व अधिक रूक्ष होईल' असे म्हणून 'चि. त्र्यं. खानोलकरांची निर्मितिप्रक्रिया' हा विषय दिला. नोकरीअभावी मी ते काम पूर्ण करू शकलो नाही. पुढे मी 'साहित्यविचार व भालचंद्र नेमाडे यांच्या कादंबऱ्या' असा विषय निवडला. मात्र, आपल्या हातून घडणारे संशोधन मौलिक, अनन्य व पुढच्या संशोधनाला प्रेरक असावे, असा त्यांचा जो आग्रह होता तो किती सार्थ होता हे या विषयांवरून दिसते.

७.

दभिंनी काव्य, नाटक, कथा, कादंबरी, चरित्र, आत्मचरित्र अशा सर्वच साहित्यप्रकारांची समीक्षा केली आहे. या प्रत्येक प्रकारच्या समीक्षेत त्यांनी काही महत्त्वाचे योगदान दिले आहे. त्यापैकी एक म्हणजे आधुनिक मराठी कवितेच्या त्यांनी सांगितलेल्या दोन परंपरा. 'दुसरी परंपरा' (१९७४) व 'पहिली परंपरा' (१९७६) या ग्रंथातून त्यांनी मराठी काव्याच्या प्रवृत्तीची वर्गवारी करून तिची वैशिष्ट्ये सांगितली आहेत. आधुनिक मराठी काव्याकडे पाहण्याचे पूर्वी जे कविनिष्ठ व कालखंडप्रधान असे दोन दृष्टिकोन होते, त्याव्यतिरिक्त दभिंनी संप्रदाय-परंपरा हा दृष्टिकोन ठेवून मराठी कवींची विभागणी परंपरेत केली. पहिल्या लौकिकतावादी-सौंदर्यवादी परंपरेत केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज व मुक्तिबोध यांचा समावेश केला; तर दुसऱ्या अलौकिकतावादी-अभिजातवादी परंपरेत त्यांनी म. मो. कुंटे, भा. रा. तांबे, माधव ज्युलियन, कुसुमाग्रज, वसंत बापट, मधुकर केचे यांचा समावेश केला. पहिल्या परंपरेच्या कवींमध्ये, स्वातंत्र्य आणि आत्माविष्कार (कविव्यापार), क्लृप्ती आणि उत्तरदायित्व (काव्यव्यापार) ही वैशिष्ट्ये आहेत. या दुसऱ्या परंपरेने, सांस्कृतिक अनुवंशशून्यता, व्यक्तिवाद, व्यक्तित्वाचा अविष्कार, यांचा त्याग केला; आणि परंपरादर्शन, लौकिक व्यक्तित्वाचा विलोप, लौकिक अनुभवाची-पराअनुभवाची जोड दिली. ही दुसऱ्या परंपरेची वैशिष्ट्ये होत. या वर्गवारीत काही कवींचा समावेश (उदा. कुसुमाग्रज) करण्याबाबत काहीजण (उदा. डॉ. अक्षयकुमार काळे) असहमत झाले, पण एकूण मराठी कवितेतील आशयसूत्रे व कवींच्या व्यक्तित्वाचे हे आकलन व प्रवृत्ती शोधण्याच्या त्यांच्या प्रयत्नाला सर्वांनीच दाद दिली.

तीच गोष्ट साठोत्तरी साहित्याबद्दल त्यांनी निरीक्षणे नोंदवलेल्या 'युगदर्शन' या निबंधाची. यात दभिंनी जीए., चित्रे, तेंडुलकर, ए. वि. जोशी, पु. शि. रेगे, कमल देसाई ते भालचंद्र नेमाडे यांच्यापर्यंतच्या नववाङ्मयाबद्दलची निरीक्षणे नोंदवली. चित्रे मर्ढेकरनिष्ठ आहेत. जीएंनी भावे-गाडगीळ यांचे बळ एकत्र केले. ग्रेसने रेग्यांचे विशुद्ध वळण घेतले. या पिढीचे स्फूर्तिस्थान नवसाहित्याची पहिली पिढी व कामू-सार्त्र, बोद्लेअर, काफ्का हे आहे, अशी निरीक्षणे मांडून दभि थांबत नाहीत, तर या साहित्यामागची जागतिक पार्श्वभूमी पण ते सांगतात : 'नवअनुभववाद्यांनी अध्यात्म व नीतिशास्त्राला हद्दपार केले व विज्ञाननिष्ठ सत्यांना पुनरुक्त किंवा वर्णनपर ठरवले. आधार उरला तो व्यक्तीला तिच्या इंद्रियानुभवाचाच, या इंद्रियानुभवातून व्यक्त होणाऱ्या अनुमानांचाच. ही अनुमाने जेव्हा भावपूर्ण होतात तेव्हा

त्यातून कला निर्माण होते व ती जेव्हा वर्णनपर असतात तेव्हा त्यातून शास्त्र अवतरते. या पॉझिटिव्हिझमचा व अस्तित्ववादाचा फार जवळचा संबंध आहे' ( हिमवंतीची सरोवरे : ६). हे वाचल्यावर ग्रेस, चित्रे, कोलटकर हे कवी इंद्रियानुभवाला का महत्त्व देत होते ते कळते. दभि नुसते आस्वादक समीक्षक नव्हते. आस्वादातून चिंतनाच्या आधारे ते साहित्याचा व संस्कृतीचा, लेखकाच्या प्रवृतीचाही अन्वयार्थ लावत. जीए- ग्रेस-चित्रे-नेमाडे-कमल देसाई आदींच्या लेखनप्रकृतीचे स्वरूप व त्याची कारणेही त्यांनी सांगितली आहेत. हेच तर समीक्षेतील साहित्यकृतीचे अर्थनिर्णयन आणि लेखकाचे मूल्यमापन करणे होय.

दभि हे संवेदनशील, सर्जनशील, हळुवार वृत्तीचे, चिंतनशील प्रवृत्तीचे, आपली प्रतीती व अभिरुची यांच्याशी प्रामाणिक राहून लेखन करणारे समीक्षक होते. अभिरुचिभंग वा अभिरुची संघर्ष यांतून ते समीक्षा लिहीत असत. मराठी प्रतिभा व मराठी साहित्य परंपरा, मराठी अभिरुची व मराठी संस्कृती यांचे त्यांना भान होते. वाङ्मयीन महात्मतेचा त्यांना कायम ध्यास होता. तिचे पाईक असणाऱ्यांचा ते कायम शोध घेत असत. मराठी साहित्याची ही महात्मता ज्ञानेश्वर-तुकाराम, मर्ढेकर, बेडेकर-जीए, या मानदंडांवर उभी आहे. चित्रे-ग्रेस, मुक्तिबोध-म. म. देशपांडे हे या स्तंभाचे आधार आहेत, असे ते मानत. मराठी अभिरुची या लेखकांशी संवादी राहावी असा त्यांचा ध्यास होता. याच्याशी विसंवादी लेखन करणाऱ्या पु. ल., व. पु. अशा लोकप्रिय लेखकांची तर त्यांनी दखलही घेतली नाही. त्यामुळेच या मानदंडाला धक्का पोहोचवणाऱ्या खांडेकर-फडके-देसाई असे कादंबरीकार, यांच्या मर्यादा त्यांनी मांडल्या; तर बापट-पाडगावकर-करंदीकर यांनी मर्ढेकरांनी निर्माण केलेल्या अभिरुचीवर बोळा फिरवला, अशी टीका केली.

मग दभि मानत या मानदंडाच्या परंपरेतील आजचा लेखक कोण, असा प्रश्न पडतो. दभिंचा १९६४ चा 'युगदर्शन' लेख आणि पद्मगंधातील २०१६चा 'नेमाडे : नवे आकलन' हा लेख वाचल्यावर याचे उत्तर सापडते. नेमाडे यांच्या भाषेचे अर्थप्रभुत्व, समाजाकडून प्रमेयाकडे झालेला त्यांचा प्रवास, विविध अंगाने अनुभव घेण्याची जोखीम, संवादप्रधान निवेदनपद्धती, पात्रांचे मनोविश्लेषण टाळून त्यांच्या भाषिक वैशिष्ट्यांतून त्यांचे मन व जाणीव व्यक्त करण्याची पद्धत, स्वच्छंदतावाद व अभिजातवादाचे मिश्रण, सामाजिक हिंमत, भाषिक जाण आणि कलात्मक प्रतिभा, उत्कट निर्मितिप्रक्रिया व अभिव्यक्तीची उस्फूर्तता, विश्ववात्सल्य व भावकाव्यात्मक मन या वैशिष्ट्यांच्या आधारे ते कादंबरीकार व कवी नेमाडे यांना मर्ढेकरांनंतरचे स्थान देतात. 'मर्ढेकर आणि नेमाडे यांच्या प्रतिमा-प्रतीकांचा तौलनिक अभ्यास होईल तेव्हा प्रत्येक मराठी साहित्यिकाला आपले प्रतिमाविश्व पडताळून पाहावेसे वाटेल' अशी या दोघांच्या शैलीची अनन्यता सांगून दभि म्हणतात, 'विश्ववात्सल्य आणि भावकाव्यात्मता हे महान साहित्यकृतींचे दोन महत्त्वाचे गुण आहेत... दोघांच्याही साहित्यात त्याचे दर्शन घडते. मर्ढेकरांची कविता फल्गू नदीसारखी पालथी वाहणारी आहे. तिचे गुण सौंदर्यवृत्ती असलेल्या रसिकांसच जाणवतात. उलट, नेमाडे यांची कादंबरी कड्यावरून कोसळणाऱ्या प्रपातासारखी आहे. तिचा घोष सर्वांच्या कर्णपटलावर जाऊन आढळतो. मर्ढेकरांच्या नसानसात भावकाव्यात्मकता आहे, तर नेमाड्यांची भावकाव्यात्मकता नाडीच्या ठोक्याप्रमाणे टप्प्याटप्प्याने प्रकटते' (पद्मगंधा, दिवाळी, २०१५ : २२), असे म्हणून त्यांनी ज्ञानेश्वर-तुकाराम-मर्ढेकर परंपरेत नेमाड्यांना स्थान दिले आहे.

दभिंच्या समीक्षेने सामाजिक भूमिका मात्र घेतली नाही. साहित्य आणि समाज यांचे नाते असते, साहित्यात घेतलेली भूमिका समाजजीवनात बदल घडून आणते, या साठोत्तरी साहित्याने घातलेल्या भूमिकेबद्दल दभिंची समीक्षा मौन बाळगते. साहित्य व समाज यांचा संबंध भाषिक असतो, अशी त्यांची भूमिका होती, तीच देशीवादी साहित्याचीही आहे. समीक्षेने साहित्याबद्दल भाषिक भूमिका घ्यावी, असे दभिंचे विवेचन होते. दुसरे असे, की नव्वदनंतरच्या साहित्यावरही दभिंनी एकत्रित भाष्य केले नाही. त्यांच्या विपुल समीक्षेची त्या प्रमाणात दखल घेतली गेली नाही त्याची ही कारणे असावीत.

असे असले, तरी आपली अभिरुची व आपला आस्वाद यांच्या आधारे सामाजिक अभिरुची व साहित्यनिर्मिती यांचा अन्वय लावणे, समाजाची अभिरुची विकसित करणे, साहित्यनिर्मितीला दिशा देणे, साहित्याच्या परंपरेत कलाकृतीची व लेखकाची स्थाननिश्चिती करणे हेच तर समीक्षकाचे कार्य असते. त्यामुळे वाचक व लेखक दोघांनाही मार्गदर्शन होत असे. दभिंनी हेच केले. मराठी साहित्य परंपरा कशी परिपुष्ट होईल हा मर्ढेकर-नेमाडे यांच्याप्रमाणेच त्यांचाही ध्यास होता. वाचकाच्या अभिरुचीवर, लेखकाच्या प्रतिभेवर व निर्मितीवर संस्कार करणे हे थोर समीक्षकाचे कार्य असते. ते दभिंनी आयुष्यभर व्रतस्थपणे केले.

●

प्रा. देवानंद सोनटक्के
चलभाष : ९८६०२६३१६३
anandsonu23@gmail.com



अनुक्रमणिका



आदरांजली



# जातेगावकर नव्या वळणावर हरपलेला लेखक

ज्येष्ठ कथाकार-कादंबरीकार आनंद विनायक जातेगावकर यांचे अलीकडेच निधन झाले. बहुश्रुत आणि विदग्ध चिंतनशीलतेने संदर्भसमृद्ध असे त्यांचे लिखाण आहे. साहित्यिक कारकिर्दीच्या एका नव्या वळणावर हरपलेल्या जातेगावकर यांच्या कार्यकर्तृत्वावर प्रकाश टाकणारा लेखक-समीक्षक संजय भास्कर जोशी यांचा लेख.

संजय भास्कर जोशी









हुतेक साहित्यिक आपल्या पहिल्या-दुसऱ्या पुस्तकातच स्वत:चा, स्वत:च्या प्रतिमेचा आणि शैलीचा यशस्वी शोध घेतात आणि तिथे सापडलेल्या वाटेवर आपापल्या मगदुराप्रमाणे उंची आणि खोली गाठत मार्गक्रमणा करतात. नेमाडे 'कोसला'च्याच वाटेवर पुढे जात जात अचाट आणि अफाट उंची वाढवत 'हिंदू'पर्यंत पोचतात, तर श्याम मनोहर 'कळ', 'उत्सुकतेने मी झोपलो', 'खेकसत म्हणणे आय लव्ह यू'... या वाटेने उपरोधपूर्ण समाजदर्शनाच्या अधिकाधिक खोलात शिरतात. काही लेखक मात्र असे असतात, की ते बराच काळ विराम घेऊन अनेक वर्षांनी अगदीच वेगळे वळण घेऊन पुन्हा एकदा स्वत:ला नव्याने शोधतात. आनंद विनायक जातेगावकर हे एक असे दुर्मिळ लेखक होते. १९७४ साली प्रसिद्ध, म्हणजे खरेच अतिशय चांगल्या अर्थाने प्रसिद्ध झालेल्या, 'मुखवटे' या बहुतांशी 'सत्यकथे'त प्रकाशित झालेल्या त्यांच्या कथांचा संग्रह आला. मध्यमवर्गीय कौटुंबिक भावविश्वाच्या पार्श्वभूमीवर माणूस आणि संस्कृती यातल्या जटिल नात्याचे अलवार पदर उलगडणाऱ्या या कथांचे रसिकांनी स्वागत केले. पण जातेगावकरांनी मग एक दीर्घ विराम घेतला आणि मग त्यांचे पुढचे पुस्तक आले तब्बल तीस वर्षांनी- थेट २००४ साली. 'श्रीमंत गोपिकाबाईंची बखर'. त्यानंतर त्यांच्या 'अस्वस्थ वर्तमान' (२०१३), 'डॉ. मयंक अर्णव' (२०१५), 'आणि मी, मी ऊर्फ सेल्फी' (२०१५) या तीन कादंबऱ्या तसेच 'व्यासांचा वारसा' हे संशोधनपर ललित लेखन (२००९), 'काफ्काच्या ट्रायल'वर आधारित 'कैफियत' (२०११) अशी पुस्तके प्रकाशित झाली. म्हणजे ३० वर्षांनंतर जातेगावकरांच्या लेखणीने अगदी नवेच वळण घेतले, पण आपले दुर्दैव असे, की हे वळण घेतल्यावर अल्पकाळातच अचानक ते आपल्यातून निघून



अनुक्रमणिका



गेले. या वर्षीच २४ जानेवारीला त्यांचे निधन झाले आणि एक अनोखे वळण घेता घेता हा मोठ्या ताकदीचा हा लेखक आपल्यातून निघून गेला. प्रकाश नारायण संत यांनीदेखील मध्ये अनेक दशके असाच विराम घेतला होता; पण ते पुन्हा लेखनाकडे परतले ते आधीच्याच वाटेवर अधिक जोमाने. जातेगावकरांनी मात्र अलीकडच्या लेखनात अतिशय वेगळे वळण घेतले होते. व्यक्तिकेंद्री लघुकथेकडून ते सामाजिक चिंतनशीलतेच्या अंगाने कादंबरीकडे वळले होते. या वाटेवर ते अधिकाधिक उंची गाठणारे लेखन करू शकतील असे वाटत होते, पण दुर्दैव...

## एक

'मुखवटे' संग्रहातल्या कथा साधारण १९६८ ते १९७३ या पाच वर्षांत सत्यकथेत प्रकशित झालेल्या आहेत. जातेगावकरांची सूक्ष्म चिंतनशीलता त्यातून दिसत असली, तरी सामाजिक आशयापेक्षा त्यातल्या बऱ्याच कथा मध्यमवर्गीय जगण्यातले भावुक आणि सांस्कृतिक कंगोरे तपासणाऱ्या आहेत. या कथांमधली सूक्ष्मता आणि सूचकता थक्क करणारी आहे. 'संग्रहासंभीची रान' ही कथा याची समर्थ साक्ष देणारी कथा आहे. सबंध कथा सुकुमार या सहावीतल्या मुलाच्या एका दिवशीच्या रानातल्या सफरीची कहाणी सांगते, पण तरीदेखील ही कथा त्याच्या आईचीच आहे हे आत कुठे तरी आपल्याला जाणवत राहते, हे जातेगावकरांचे कसब. केवळ सुकुमारच्या आठवणीत दोन-तीन वेळा आईविषयी चार-दोन वाक्यांत काही शेरे येतात आणि त्यावरच जातेगावकर ही कमाल करतात. इंजिनियर असलेल्या वडिलांबरोबर सुकुमार एक दिवस नदीकाठी फिरायला जातो आणि अचानक जंगलात हरवतो त्याची ही कथा. वडिलांची इच्छा त्याने पुढे इंजिनियर व्हावे; पण आईचे म्हणणे- त्याचा कल असेल तसे त्याने करावे. चित्रे काढावी, निसर्गात रमावे. एकदा वडील टूरवर असतात तेव्हा रात्री सुकुमारला जाग येते. शेजारी आई दिसत नाही तेव्हा तो पाहतो, तर आई गॅलरीत जाऊन चंद्रप्रकाश पाहत असते. एकदा वर्गातले मित्र फुलपाखराचे पंख फाडतात तेव्हा सुकुमार रडायला लागतो, तेव्हा आई म्हणते, ''वाईट वाटलं तरी रडू नये, मुकाट्यानं रडू गिळावं. दुसऱ्याला दाखवू नये. धीरानं सोसावं.'' बस. अशा दोन-तीनच आठवणी आईच्या. आणि बाबांबरोबर सफरीवर आलेला असताना बाबा कामासाठी नदीकाठी जातात, तेव्हा जीपमध्ये बसलेला सुकुमार कुतूहल म्हणून बाहेर पडतो, रानात शिरतो आणि रानातच हरवतो. शेवटी तर मरतोच. चक्रावून टाकणाऱ्या या शेवटाने ही चिमुकली कथा आपल्याला विलक्षण अस्वस्थ करते. वाट चुकून रानात हरवणे ठीक आहे, पण असे मरून का जावे सुकुमारने? मरतो तो कोण? काय? ही कथा सुकुमारच्या मरण्याची का आईची?.... अशा प्रश्नांच्या वावटळीत सोडून वाचकाच्या प्रतिभेलाच ही कथा थेट साद घालते. या पहिल्याच कथेत वाचकाच्या सर्जनाला सामील करून घेत जातेगावकर आपल्या कथालेखनाची वाट निश्चित करतात. 'मुखवटे' या त्यांच्या अतिशय गाजलेल्या कथेत श्रद्धा आणि श्रद्धाभंगाचं तीव्र दु:ख ते अन्नपूर्णा या मूल नसलेल्या ओसरत्या वयातल्या स्त्रीच्या रूपात मांडतात. स्वत: श्रद्धाळू असणाऱ्या अन्नपूर्णाबाईंच्या नशिबी आलेला श्रद्धाभंग नेमका वाचकाच्या मनात तरंग उमटवेल, अशी विलक्षण रचना आहे या कथेची. घरात गौरी बसतात आणि त्या निमित्ताने बायकांच्या मनोविश्वातल्या श्रद्धा काय उफराटे खेळ मांडतात त्याची ही करुण कहाणी आहे. अस्सल मराठी सांस्कृतिक परंपरा आणि अंधश्रद्धा याबाबतचे जातेगावकरांचे सूक्ष्म निरीक्षण या कथेत दिसून येते. 'गुलमोहोर' ही या संग्रहातली अशीच एक समर्थ कथा. तारुण्याच्या उंबरठ्यावरच्या दिलीप या मुलाची ही कथा. जगण्याचा अविभाज्य भाग असलेली जुळी बहीण हळूहळू तिच्या संसारात रमल्याने वजा होत जाणे आणि दुसऱ्या कुणा तरुणीच्या मधुर स्त्रीत्वाची आयुष्यात चाहूल येणे, या अतिशय तरल अनुभूतीवरची ही कथा. इथे जातेगावकरांची सूचक लेखणी इतकी काही तरल होते की जणू एखादी मधुर भावकविताच! बहीण-भावाच्या नात्याचे खोलवरचे अन्वयार्थ सूचकतेने उलगडणारी ही कथा लघुकथेची सर्व सामर्थ्ये घेऊन प्रगटते.

एकुणातच, 'मुखवटे'मधल्या कथा जातेगावकरांची 'लघुकथा' या माध्यमावरची जबरदस्त पकड दाखवतात, पण या साऱ्याच कथा कुठे तरी व्यक्तिकेंद्री आहेत. एकेका विशिष्ट व्यक्तीच्या भावविश्वाचा ठाव त्या घेतात. 'सनई'सारख्या कथेत तर या मनस्वी आत्मकेंद्रिततेला अस्तित्ववादाचे पदर जोडल्यासारखे वाटतात. पुन्हा एकदा या कथेत बहिणीचे आयुष्यातून वजा होणे आणि नव्या स्त्रीत्वाची चाहूल आहेच. या सगळ्याच कथांतून जातेगावकर आकांताने काही तरी शोधताना दिसतात. एक धूसर उदासीनता आणि अस्वस्थता या कथांवर काजळी धरून आहे. पण तरीही मोठ्या पटाअभावी या कथा चुटपूट लावून जातात हे नमूद करायला हवे. म्हणूनच का तीस वर्षांनंतर जातेगावकरांना कादंबरीच्या विशाल पटाने साद घातली? लेखक म्हणून जातेगावकरांच्या लेखनातले हे दुसरे वळण या अर्थाने मौलिक आहे.

## दोन

'अस्वस्थ वर्तमान' या जातेगावकरांच्या कादंबरीला मानाचा 'जयवंत दळवी पुरस्कार' मिळाला त्या वेळी वक्ता म्हणून बोलताना मी जातेगावकरांच्या या वळणाविषयी पुरेसे न जाणताच काहीसे असमाधान व्यक्त केले होते. (त्या वेळी पुरस्कार स्वीकारताना जातेगावकरांनी केलेले भाषण मी आजवर ऐकलेल्या पुरस्कार स्वीकाराच्या भाषणांतले सर्वश्रेष्ठ असावे. कारण उत्तरादाखल त्यांनी केवळ एक साताठ ओळींची कविता ऐकवली, बस.) पण जातेगावकरांच्या अलीकडच्या इतर कादंबऱ्या वाचल्या आणि मला या नव्या वळणाची नीट चाहूल लागली. व्यक्तिकेंद्री लेखनाकडून (आणि पर्यायाने लघुकथेकडून) जातेगावकर विचारपूर्वकच या सामाजिक चिंतनशील आशयाने भारलेल्या कादंबरीकडे वळले होते. 'अस्वस्थ वर्तमान' हे त्यातले एक दमदार पाऊल म्हणावे लागेल.

इतिहासाची मांडणी (किंवा खरे तर बहुतेक वेळा उदात्तीकरण) करताना कित्येक वेळा 'फिक्शन'चा आधार घेऊन 'ऐतिहासिक कादंबरी' लिहिली जाते. पण इतिहासाची परखड तपासणी आणि कठोर मूल्यमापन करायलादेखील अशा प्रकारे कादंबरीचा (पक्षी : फिक्शनचा) आधार घेतल्याची फारशी उदाहरणे सापडणार नाहीत. 'अस्वस्थ वर्तमान' हे अशा प्रकारे इतिहासाची तपासणी करत, त्याची नाळ वर्तमानाशी जुळवत व्यक्ती आणि घटनांचे पुनर्मूल्यमापन करणारे मौलिक पुस्तक आहे. ब्लर्बवर थोरात म्हणतात त्यानुसार यात अशोक नारायण गोरे वगैरे काही पात्रे आणि काही घटना आहेत; पण एकूणच तो धागा इतका क्षीण आहे, की काही वेळा त्याची मौजच वाटते. म्हणजे तीस-चाळीस पानी चिंतन किंवा इतिहासकथन करताना मध्येच दर पाच-सहा पानांच्या नंतर एकदाच 'अशोकजी' असे किंवा 'अशोक नारायण गोरे' इतकेच शब्द लिहायचे आणि चालले आहे ते सारे अशोकजींच्या मनातले संज्ञाप्रवाह आहेत बरे का, अशी जाणीव करून द्यायची, असा प्रकार आहे. हे काही मी आक्षेप म्हणून नव्हे तर एक निरीक्षण म्हणून नोंदवत आहे.

या लेखाच्या पहिल्या भागात आपण पाहिल्यानुसार मुळात जातेगावकरांची याआधीची ओळख आपल्याला होती ती एक उत्कृष्ट लघुकथाकार म्हणून. दरम्यान त्यांनी 'व्यासांचा वारसा' हे काहीसे ललित अंगाने जाणारे वैचारिक पुस्तकही लिहिले. 'अस्वस्थ वर्तमान' जरी 'कादंबरी' म्हणून आलेले असले तरी त्यात जातेगावकरांचे सामाजिक चिंतन आणि वैचारिक विवेचनच मुबलक आहे. तसे बहुतांश चांगल्या कादंबऱ्यांत ते असतेच, हे तर सामान्य सत्य, पण त्याची मांडणी फिक्शन आणि नॉन-फिक्शन या दोन टोकांच्या मध्ये कुठे तरी असते. 'अस्वस्थ वर्तमान' नॉन-फिक्शनच्या टोकाकडे अंमळ अधिकच कललेले आहे इतकेच. अशोक नारायण गोरे हे इतिहासाचे निवृत्त प्राध्यापक. त्यांचे इतिहास संशोधन मुख्यतः मराठा कालखंडावरचे. ते प्रसिद्ध करावे तर हे पडले उच्चवर्णीय. 'आमचा इतिहास आम्ही सांगू ... तुमचा मुद्दा गेला खड्ड्यात! मुद्दा मांडणारे तुम्ही कोण? हा मुद्दा तुम्ही का मांडला? इथे राहायचं आहे की नाही तुम्हाला? जगायचंय की नाही?' अशा प्रकारच्या दहशतपूर्ण सामाजिक वास्तवाने अशोक गोरे इतिहासावर लिहायचे थांबले. मग उरले ते कोणत्याही बारीक निमित्ताने मनभर थैमान घालणारे संज्ञाप्रवाह. तेच या पुस्तकात पसरलेले आहेत. मग ते निमित्त कोणतेही किरकोळ असते. उदाहरणार्थ, अशोक नारायण गोरे मुंबईत दादर स्टेशनवर उभे आहेत. (का कुणास ठाऊक) आणि त्याच वेळी दलितांचे लोंढेच्या लोंढे चैत्यभूमीकडे चालले आहेत. त्यावर येते एक प्रदीर्घ चिंतन. महापुरुषांचे विचार आपण खरेच घेतो का केवळ दैवते निर्माण करतो? किंवा, अशोक गोरे अजिंठ्याचे लेणे बघतात आणि मग प्रदीर्घ चिंतन. बुद्ध. जातक कथेतली एक गोष्ट. तिचे अन्वयार्थ वगैरे वगैरे. किंवा अशोक गोरे 'विश्रब्ध शारदा'मधले एक पत्र वाचताहेत आणि त्या निमित्ताने ते संपूर्ण पत्र आणि त्याचे सामाजिक, नैतिक वगैरे अन्वयार्थ. अशा प्रदीर्घ चिंतनात आणि विवेचनात अधूनमधून फक्त एक शब्द : 'अशोकजी', अशी साधारण या कादंबरीची रचना आहे. खरे तर हे दहा-बारा ललित/वैचारिक लेख म्हणून आले असते तर योग्य त्या भूमिकेतून वाचले गेले असते. पण या चिंतनातले काही विचार आणि प्रश्न बहुसंख्यांना अडचणीत टाकणारे / बोचणारे आहेत हे मात्र खरेच आहे. त्यासाठी हे 'कादंबरी'चे कृतक आवरण असावे का, हा प्रश्न माझ्या मनात आला होता त्या वेळी. एक मात्र आहे- ललित / वैचारिक लेखन म्हणून वाचले तर हे लेखन आहे अतिशय मार्मिक, मौलिक आणि दणदणीत. अनेक ऐतिहासिक संहितांचा अतिशय उत्तम वापर करत जातेगावकर हे आधुनिक प्रश्नोपनिषद आपल्यासमोर ठेवतात. एका अर्थाने कादंबरीच्या कक्षाच रुंदावतात. अतिशय बुद्धिमान, मोकळ्या आणि सकारात्मक मनाने ते इतिहासाला प्रश्न विचारतात, ऐतिहासिक घटनांचे अन्वयार्थ लावतात आणि या साऱ्याची नाळ वर्तमानाशी जोडतात, जो अर्थातच अस्वस्थ आहे. या अर्थाने अगदी आवर्जून वाचावे अशी ही कादंबरी आहे. अनेक विषयांवरचे मुक्त चिंतन या पुस्तकात जागोजागी आढळते. मग त्यात कधी संगीत, चित्रपट वगैरे विषयांवरचे मूलभूत विचारदेखील येतात, आठवणी येतात.



सुरुवातीच्या काळातल्या लघुकथेत जातेगावकर तीक्ष्ण आशयाची लघुकथा अतिशय बांधीव आणि रेखीव रचनेने सादर करतात, तर या नव्या वळणावर ते मुक्त चिंतनाच्या वाटेने जातात. या नव्या वळणावर त्यांच्या बहुश्रुत आणि विदग्ध चिंतनशीलतेने संदर्भसमृद्ध झालेले लेखन वेगळाच बौद्धिक आनंद देते. साहित्य, राजकारण, चित्रपट, समाजकारण अशा अनेक विषयांतले त्यांचे चिंतन अस्वस्थ करणाऱ्या वर्तमानाचे एकेक कोपरे तपासताना दिसते.



'कागज के फूल'सारख्या विख्यात चित्रपटाचं अतिशय मार्मिक आणि खोलवरचं विश्लेषण येतं. त्याची मनोज्ञ समीक्षादेखील येते.

टीव्हीवर अशोक गोरे गांधीजींवरची एक डॉक्युमेंटरी बघतात. एवढ्या किरकोळ निमित्ताने मग जातेगावकर गांधीजी, शांती, अण्वस्त्र स्पर्धा, आंतरराष्ट्रीय राजकारण याबद्दल चिंतन करता करता थेट वाजपेयी, कलाम यांच्या भूमिकेचे परीक्षण करत 'देशासाठी प्राणार्पण करणाऱ्यांना परमवीरचक्र देऊन काय साधलं जातं? ... हिंसेचं, सूडाचं अखंड फिरतं चक्र. त्या सूडचक्राला अजून अजून गती देणारं हे परमवीरचक्र,' असं विचारप्रवर्तक विधान करतात आणि शेवटी थेट धर्म आणि देशभक्ती या संकल्पनांविषयीच आपल्याला विचारात टाकतात. 'धर्म आणि देशभक्ती खरंच मनाची भूक आहे का?... सामान्यांना विध्वंस नकोय हे तरी कितपत खरं आहे?' असले उफराटे आणि ऊरफाटे सवाल करतात. एकुणात, ही कादंबरी अस्वस्थ भवतालाचे मनोज्ञ, पूर्वग्रहरहित आणि परखड परीक्षण करणारे प्रदीर्घ चिंतन आहे.

'डॉ. मयंक अर्णव' या कादंबरीत जातेगावकर काही वर्षांपूर्वी अतिशय गाजलेल्या आणि समाजमनाला ढवळून टाकलेल्या आरुषी तलवार हत्याकांडाची पार्श्वभूमी घेतात. खरे तर पार्श्वभूमी म्हणण्यापेक्षा नावे आणि किरकोळ घटना बदलून ते त्या हत्याकांडाची गोष्ट सांगतात. पण सत्य म्हणजे नेमके काय? न्यायालयात सिद्ध होते तेच सत्य असते का? यासारख्या प्रश्नांबरोबरच मानवी मनातली लैंगिकता, तिचा हिंसेशी असलेला अटळ संबंध आणि त्या निमित्ताने ते एकूणच सांस्कृतिक आणि सामाजिक व्यामिश्रतेचा प्रगल्भ शोध घेतात. कथेच्या केंद्रस्थानी असलेला (ज्याच्यावर आपल्या मुलीच्या खुनाचा आरोप आहे असा) डॉ. मयंक अर्णव याच्यावरचा खटला, त्यातला सत्यशोध आणि त्याला समांतर अशा ज्ञानेश्वरीतल्या ओव्यांचे अन्वयार्थ, अशी गुंतागुंतीची पण वेधक रचना करून जातेगावकर एक व्यामिश्र पट आपल्यासमोर मांडतात. या कादंबरीत काय किंवा 'मी, मी ऊर्फ सेल्फी' या कादंबरीत काय, ते कादंबरीचा विशाल पट अतिशय समर्थपणे कवेत घेतात आणि दणकट सामाजिक चिंतन व्यक्त करतात. अर्थात या सामाजिक चिंतनात त्यांची प्रयोगशीलता नजरेत भरावी अशी आहे. कारण 'अस्वस्थ वर्तमान'मध्ये ते अशोक गोरे यांच्या संज्ञाप्रवाहाद्वारे हे चिंतन करतात, तर 'डॉ. मयंक अर्णव'मध्ये ते थरारक घटनांमागच्या सत्यशोधाला आध्यात्मिक चिंतनाची जोड देतात.

## तीन

मी जातेगावकरांच्या लेखनाने नवे वळण घेतले म्हणालो ते या अर्थाने. सुरुवातीच्या काळातल्या लघुकथेत जातेगावकर तीक्ष्ण आशयाची लघुकथा अतिशय बांधीव आणि रेखीव रचनेने सादर करतात, तर या नव्या वळणावर ते मुक्त चिंतनाच्या वाटेने जातात. या नव्या वळणावर त्यांच्या बहुश्रुत आणि विदग्ध चिंतनशीलतेने संदर्भसमृद्ध झालेले लेखन वेगळाच बौद्धिक आनंद देते. साहित्य, राजकारण, चित्रपट, समाजकारण अशा अनेक विषयांतले त्यांचे चिंतन अस्वस्थ करणाऱ्या वर्तमानाचे एकेक कोपरे तपासताना दिसते. खरेच, या वळणावर त्यांच्याकडून अशाच काही समर्थ कादंबऱ्या येऊ शकल्या असत्या; पण तेवढ्यात नियतीने डाव साधला.

या छोट्याशा लेखात जातेगावकरांच्या लेखणीने घेतलेल्या या नव्या वळणाचा ओझरता आढावा तेवढा घेता आला. पण हे सारे अधिक तपशिलात शोधायला हवे. नव्या कादंबरीकारांना त्यातून बरेच काही गवसण्यासारखे आहे. त्या अर्थाने हा वारसा मराठी साहित्याला अभिमान वाटावा असा आहे.

●

**संजय भास्कर जोशी**
चलभाष : ९८२२००३४११
sanjaybhaskarj@gmail.com





# टिकेकर

## व्यासंगी संपादक - लेखक

ग्रंथलेखन आणि पत्रकारिता अशा दोन्ही प्रांतांत मौलिक योगदान दिलेले ज्येष्ठ संपादक अरुण टिकेकर नुकतेच काळाच्या पडद्याआड गेले. टिकेकर यांच्या व्यक्तिमत्त्वाचा, व्यासंगाचा नि कार्यकर्तृत्वाचा थोडक्यात वेध घेणारा ज्येष्ठ पत्रकार-संपादक अरुण खोरे यांचा लेख.

अरूण खोरे

राठी वृत्तपत्रांच्या परंपरेतील विद्वान आणि उदारमतवादी संपादक डॉ. अरुण टिकेकर यांच्या निधनाची बातमी समजली तेव्हा खरोखरच धक्का बसला. कारण जेमतेम दोन आठवड्यांपूर्वीच त्यांची नि माझी व माझ्या कुटुंबीयांची ठाण्यात भेट झाली होती.

मराठी पत्रकार परिषदेच्या वतीने पत्रकारदिनानिमित्त ६ जानेवारी २०१६ला ठाणे येथील गडकरी रंगायतनमध्ये शिवसेनेचे प्रमुख उद्धव ठाकरे आणि डॉ. अरुण टिकेकर यांच्या हस्ते पत्रकारिता पुरस्कार वितरणाचा कार्यक्रम होता. मला या संस्थेच्या वतीने आचार्य अत्रे पत्रकारिता पुरस्कार या दोन्ही मान्यवरांच्या हस्ते मिळाला. त्या वेळी डॉ. टिकेकरांचे भाषण बऱ्याच दिवसांनी ऐकायला मिळाले.

अर्थात त्यांचे भाषण ऐकताना त्यांची तब्येत बरी नाही का, अशी शंका मनात येत होती. कार्यक्रम संपल्यानंतर मी पत्नी व मुलीसह त्यांना भेटलो व नमस्कार केला. त्यांनी नेहमीच्या भारदस्त पद्धतीने 'काय खोरे, काय चाललंय?' अशी विचारणाही केली. त्यांच्या प्रकृतीकडे पाहून थोडीफार चिंता वाटत होती. तरीही आम्ही थोडा वेळ बोललो. मी त्यांना माझ्या नव्या मासिकाचे अंकही दिले आणि त्यांचा निरोप घेतला. त्यानंतर त्यांच्या निधनाचीच बातमी आली व धक्का बसला. त्यांची तब्येत थोडीबहुत बरी नसल्याचे जाणवले होते, पण ते इतक्या लवकर जातील असे मात्र वाटले नव्हते. वृत्तपत्रांतील सदरलेखन आणि त्यांचे एकोणिसाव्या शतकातील इतिहासावरचे प्रेम यांमुळे माझ्यासारखे अनेक पत्रकार त्यांच्याशी संपर्क ठेवून होते, आणि त्यांच्यावद्दलचा आदर हा नेहमीच वाढत राहणारा असा होता.



- 'महाराष्ट्र टाइम्स'चे संपादक गोविंद तळवलकर यांच्या काळात या दैनिकातील अग्रलेखांसह अनेक स्तंभ माझ्यासारख्या वाचकांना विशेष आवडत होते. मटाच्या रविवार पुरवणीत त्या वेळी डॉ. अरुण टिकेकर यांचे 'इकडे-तिकडे' हे सदर सुरू होते. उत्सुकतेने ते आम्ही वाचत असू. एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकातील काही महानुभावांचा आणि त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा परिचय, असे या सदराचे ढोबळमानाने स्वरूप होते. अरुण टिकेकर यांच्या लेखनाशी वाचक म्हणून माझ्या पिढीचा हा पहिला धागा जोडला गेला. त्यानंतर मग त्यांच्याशी परिचय झाल्यावर आणि त्याही






पुढे त्यांच्या संपादकत्वाखाली लोकसत्तात काम करताना या व्यक्तीचे वेगळेपण आणि मोठेपण कळत गेले- जाणवत गेले.

टोपणनावाने लिहिण्याची डॉ. टिकेकर यांची खासियत त्यांच्या अनेक स्तंभलेखनांत लक्षात आली. त्याला एक पूर्वपीठिका होती. त्यांचे आजोबा आणि काका हे दोघेही टोपणनावाने आपापल्या काळात वृत्तपत्रांत लेखन करीत होते. तोच वारसा पुढे चालवावा, असे बहुधा टिकेकरांनी ठरविले असावे. वर ज्या सदराचा उल्लेख केला आहे त्यासाठी त्यांनी 'आनंदीआनंद' हे टोपणनाव घेतले होते. त्यानंतरच्या अनेक सदरांसाठी ते अशी काही वेगळी टोपणनावे घेत होते.

'लोकसत्ता'चे संपादक होण्यापूर्वी ते 'महाराष्ट्र टाइम्स'चे सहसंपादक होते आणि त्यापूर्वी त्यांनी बराच काळ 'टाइम्स ऑफ इंडिया'च्या संदर्भ ग्रंथालयाचे प्रमुख म्हणून काम केले तीन-चार ग्रंथ संदर्भासाठी उघडून ठेवलेले होते. मी त्यांना नमस्कार केला व तेथे बसलो. टिकेकरांच्या 'जन-मन' या सदराची सुरुवात होत होती, त्याबाबत ते मला सांगत होते. 'लोकसत्ता'च्या शनिवार पुरवणीत एक पूर्ण पानभर त्यांचा हा स्तंभ प्रसिद्ध होऊ लागला. त्यासाठी त्यांनी 'गणक' हे टोपणनाव घेतले होते.

या परिचयानंतर मग आमचा संपर्क सुरू झाला. अर्थातच गडकरी यांच्याप्रमाणे ते आम्हा सर्वांचे बॉस होते. साखळी वृत्तपत्र समूहातील अशा महत्त्वाच्या पदावरील संपादकाचे स्थान फार महत्त्वाचे असते; आणि हे पद महत्त्वाचे आहे, स्थान महत्त्वाचे आहे, असा एक ठसाही उमटवण्याचा प्रयत्न डॉ. टिकेकर करत होते. 'लोकसत्ता'चे संपादक म्हणून १९९१ सप्टेंबरमध्ये त्यांची नियुक्ती झाली आणि त्याच वेळी मुख्य संपादक म्हणून गडकरी यांना स्थान देण्यात आले. त्यानंतर वर्षभराने गडकरी निवृत्त झाले व सर्व धुरा



**'द क्लॉइस्टरर्स पेल : अ बायोग्राफी ऑफ द युनिव्हर्सिटी ऑफ बॉम्बे' हा इंग्रजी ग्रंथ त्यांनी लिहिला आणि याच विषयाचा मराठी ग्रंथही 'ऐसा ज्ञानसागरु : बखर मुंबई विद्यापीठाची' त्यांनी लिहिला. हे दोन्ही ग्रंथ पाहताना संशोधक व व्यासंगी लेखक किती पराकोटीच्या प्रयत्नांनी सगळी साधने जमवतो, कागदपत्रे शोधतो, फोटोंचे संदर्भ घेऊन असा महान ग्रंथ निर्माण करतो, यामुळे थक्क व्हायला होते.**

होते. अरुण टिकेकर हे नाव मटाचा वाचक म्हणून आमच्या परिचयाचे झाले होते, मात्र त्यानंतर ते 'लोकसत्ता'चे संपादक होतील याची खरोखर कल्पना नव्हती. मी याच काळात 'लोकसत्ता'चे संपादक माधवराव गडकरी यांच्या प्रभावामुळे 'सकाळ'मधून बाहेर पडून तेथे रुजू झालो होतो.

लोकसभा निवडणुकांचे कव्हरेज करण्यासाठी १९९१ साली मी गुजरातला गेलो होतो. तेथून परतताना मुंबईत भेटून वार्तापत्र द्या आणि मग पुण्याला जा, अशी सूचना गडकरींनी केली होती. त्यानुसार मी मुंबईला उतरलो व नरिमन पॉइंटवरील एक्स्प्रेस टॉवर्समधील 'लोकसत्ता'च्या कार्यालयात गेलो. तिथे गुजरातचे वार्तापत्र आणि पु. ग. मावळंकर यांची मुलाखत असे विषय घेऊन गडकरींना दिले. विषय वाचताना ते मला म्हणाले, "अहो आपल्याकडे अरुण टिकेकर जॉइन झाले आहेत, त्यांना जाऊन भेटा." त्यानंतर मी टिकेकरांना भेटण्यासाठी गेलो, तेव्हा त्यांच्या टेबलावर टिकेकरांकडे सोपविण्यात आली. यानंतर जवळपास मी त्यांच्या संपादकत्वाखाली १९९७ पर्यंत काम करीत होतो. त्या काळातील व्यक्तिगत अनुभव सांगण्याची ही जागा नाही. तथापि, विविध विषयांवरचे मतभेद त्यांच्याबरोबर असायचे आणि 'बॉस इज ऑलवेज राइट' ही त्यांची ब्रिटिश संस्कृतीशी नाते सांगणारी ठाम अशी भूमिका होती.

अर्थात टिकेकरांचे ग्रंथप्रेम, त्यांचे व्यासंगी लेखन आणि इंग्रजीवरचे वाणी व लेखनाचे प्रभुत्व यांचा मोठा प्रभाव आणि दबदबा संपादकीय विभागापासून ते मार्केटिंगच्या व व्यवस्थापनाच्या सर्वोच्च पदावर असलेल्यांपर्यंत असे, हे सतत जाणवत होते. त्यांचे इंग्रजी व मराठीतील सुंदर हस्ताक्षर हा एक आमच्या आदराचा मोठा विषय होता. त्यांच्या हस्ताक्षरात ते अग्रलेख लिहीत, तेव्हा कधी तरी पुण्यात असताना कॉपी बघायला सांगितली तर मला त्याचा विशेष आनंद होत असे. याखेरीज अनेक शेरे व पत्रे त्यांच्या सहीने



अनुक्रमणिका

आमच्याकडे येत असत, त्याचाही एक दबदबा आमच्या संपादकीय विभागात विशेष जाणवायचा.

ब्रिटिशांची जीवनशैली आणि वृत्तपत्र व ज्ञानाच्या क्षेत्रातील त्यांचे भान याचे एक संमिश्र रसायन डॉ. टिकेकरांच्या व्यक्तिमत्त्वात होते. त्यामुळे कामाच्या ठिकाणी असलेली श्रेणी पद्धत त्यांनी स्वीकारलेली होती. वृत्तपत्राच्या व्यवस्थापकीय सूत्रानुसार उपसंपादक व बातमीदार हे समान श्रेणीचे असले तरी त्यांच्या दृष्टीने उपसंपादक हा बातमीदारानंतरच होऊ शकतो. यासाठी ते टाइम्स ऑफ इंडियाच्या पूर्वसुरी असलेल्या वृत्तसंपादकांची उदाहरणे देऊन आम्हाला नामोहरम करायचे. अर्थात, असा व्यासंगी संपादक आम्हाला मिळाला याचे एक विशेष समाधान आम्हा सर्वांनाच होते. त्यांच्या अफाट विद्वत्तेपुढे आणि देहबोलीतील दबदब्यामुळे 'लोकसत्ता'च्या सर्व विभागांतील लोक त्यांना शब्दश: सांगायचे तर 'टरकून' असायचे.

आरंभी फारसे विविध ठिकाणी न मिसळणारे किंवा त्याबाबत थोडेसे फटकूनही राहणारे टिकेकर नंतर मात्र मुंबई-पुण्याच्या सामाजिक-सांस्कृतिक वर्तुळात चांगलेच रमले आणि मान्यवरही झाले. अर्थातच यानंतर राजकीय वर्तुळात मिसळण्याचा मुद्दा होता. एक सुशीलकुमार शिंदे सोडले तर शरद पवार किंवा विलासराव देशमुख यांच्याशी आपला परिचयही नाही, असे ते बैठकीत आम्हाला स्पष्टपणे सांगत. त्यानंतर या दोन्ही ज्येष्ठ नेत्यांचे मैत्र टिकेकरांना मिळाले. त्यांच्या विद्वत्तेची ही पावती होती, हे वेगळे सांगायला नको. इथे आणखी एक गोष्ट नोंदवायला हवी आणि ती म्हणजे अतिशय नेमस्तपणे व मवाळ शैलीत त्यांनी संपादक या नात्याने शिवसेना, बाळासाहेब ठाकरे या सर्वांवर परखड टीका केली आणि त्याबाबत कोणतीही लेचीपेची भूमिका त्यांनी घेतली नाही.

विशेषत: त्यांनी १ नोव्हेंबर १९९७ च्या 'लोकसत्ता' अंकासाठी लिहिलेला अग्रलेख 'आम्हांसि का दिली वांगली रे...?' हा अतिशय गाजला होता. या काळात महाराष्ट्रात ठाकरे यांना टरकणारे युतीचे सरकार होते, ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. विशेष म्हणजे या अग्रलेखानंतर त्यांना पोलिस संरक्षण पुरविण्यात आले. याही काळात त्यांना अनेक शिवसैनिक 'आम्ही तुम्हाला काही होऊ देणार नाही, काळजी करू नका' असे प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष कळवीत होते. न्यायमूर्ती रानडे आणि गोपाळ कृष्ण गोखले यांच्या वैचारिक संस्कारांत घडलेल्या टिकेकरांचे हे वेगळेच दर्शन महाराष्ट्राला घडले. या गाजलेल्या अग्रलेखात त्यांनी 'सामना'ची पत्रकारिता, रमेश किणी प्रकरण, सेनाप्रमुखांचे आप्तेष्ट आणि सेनेच्या कृपेवर मुंबईत गब्बर झालेले विविध पक्षांतील बिगरमराठी नेते आणि पत्रकारितेतील सवंग मंडळी यांच्यावर आपल्या वेगळ्या शैलीत टीका केली होती. 'सामना'ने टिकेकरांवर ज्या असभ्य भाषेत लिहिले होते, त्याला प्रत्युत्तर न देण्याचा संयम राखून त्यांनी आपली वैचारिक मूस कच्ची नसल्याचाच निर्वाळा दिला.

वृत्तपत्रांच्या रगाड्यात वावरतानाही डॉ. टिकेकरांनी आपल्या इतिहास आणि ग्रंथलेखनाच्या कामाकडे दुर्लक्ष केलेले नव्हते. एक गोष्ट खरी आणि ती म्हणजे या काळात ते मोठ्या प्रमाणात महाराष्ट्र आणि देशापुढील समकालीन प्रश्नांबाबत चिंतनशील असे लेखन नियमित करीत होते. त्यामुळेच त्यांचे 'तारतम्य', 'सारांश', 'स्थल-काल', 'कालमीमांसा', 'अस्वस्थ महाराष्ट्र' यांसारखे विविध ग्रंथ प्रकाशित झाले. त्यांनी संपादकपदाची धुरा स्वीकारल्यावर साधारणत: डिसेंबर १९९२ च्या आरंभी विजय तेंडुलकरांचे 'रामप्रहर' हे सदर त्यांनी सुरू केले. त्यानंतर लगेचच ६ डिसेंबरला बाबरी मशिदीची वास्तू कारसेवकांनी उद्ध्वस्त केली. त्यानंतर संपूर्ण देशभर वणवा भडकला. त्यामुळे तेंडुलकरांच्या सदराला एक वेगळेच महत्त्व आले.

संपादकाने समाजातील तज्ज्ञ आणि विद्वान व्यक्तींना माध्यमाशी कसे जोडायचे याचा एक वेगळा मार्ग डॉ. टिकेकरांनी 'लोकसत्ता'मध्ये काम करताना दाखवून दिला आणि राबविलाही. रोजच्या दैनिकात दया पवार, सुभाष भेंडे यांची सदरे सुरू झाली. शनिवार-रविवारच्या अंकांतही अनेक मान्यवर मराठी लेखक लिहू लागले. विविध क्षेत्रांतील जाणकार या निमित्ताने 'लोकसत्ता'शी जोडले गेले. त्याचा एक वेगळा परिणाम या वृत्तपत्र समूहाच्या प्रतिमेवरही अनुकूल स्वरूपाचा झाला. बुद्धिवंतांची निष्क्रियता, साहित्य, साहित्यसंस्था, शिक्षण, शिक्षणसंस्था, विद्यापीठे, संशोधनसंस्था, सामाजिक संस्था व मंडळे आणि या सर्वांचे कारभार बघणारे लोक या एकूणच विषयाकडे त्यांनी अतिशय चिकित्सकपणे पाहिले. प्रसंगी थोडे कठोर होत यातल्या काही प्रवृत्तींवर त्यांनी अधिकचे प्रहारही केले. शिवाय डॉ. टिकेकरांचा जो सामाजिक-सांस्कृतिक अजेंडा होता त्याच्या विरोधात असणाऱ्यांनाही काही प्रमाणात त्यांचे प्रहार सोसावे लागले. भालचंद्र नेमाडे, सदानंद मोरे, द. भि. कुलकर्णी यांच्यावरचे त्यांचे लेखन थोडेसे या स्वरूपाचे होते. अर्थात वृत्तपत्राच्या जगात असल्यामुळे या सर्वांना जर काही त्यांची भूमिका मांडायची असेल तर त्याबाबत त्यांचे



अनुक्रमणिका

धोरण हे उदार आणि खुले होते.

इतिहास आणि ब्रिटिश अधिकारी व त्या काळातील संपादक हे टिकेकरांच्या व्यासंगाचे विषय होते. पुणे इलाख्यात रेसिडेंट असलेल्या किंकेड पितापुत्रांच्या काळाचा विशेष संशोधनपर अभ्यास त्यांनी केला होता. या विषयावरचे त्यांचे ग्रंथलेखन इंग्रजीतून प्रसिद्धही झाले होते. याखेरीज मुंबई विद्यापीठाचा त्यांनी लिहिलेलां इतिहास हा विद्यापीठाच्या इतिहासलेखनावरचा एक आदर्श ग्रंथ म्हणूनच नोंदला गेला आहे. 'द क्लॉयस्टरर्स पेल : अ बायोग्राफी ऑफ द युनिव्हर्सिटी ऑफ बॉम्बे' हा इंग्रजी ग्रंथ त्यांनी लिहिला आणि याच विषयाचा मराठी ग्रंथही 'ऐसा ज्ञानसागरु : बखर मुंबई विद्यापीठाची' त्यांनी लिहिला. हे दोन्ही ग्रंथ पाहताना संशोधक व व्यासंगी लेखक किती पराकोटीच्या प्रयत्नांनी सगळी साधने जमवतो, कागदपत्रे शोधतो, फोटोंचे संदर्भ घेऊन असा महान ग्रंथ निर्माण करतो, यामुळे थक्क व्हायला होते आणि 'विद्वान् सर्वत्र पूज्यते' या उक्तीची सार्थता पटते.

वर उल्लेख केल्याप्रमाणे बुद्धिवंतांची आणि विद्यापीठातील प्राध्यापकांची निष्क्रियता आणि विचारहीनता यांवरही डॉ. टिकेकर सतत लिहीत असत. या संदर्भातील त्यांचे तीन विविध ग्रंथ अलीकडच्या ५-६ वर्षांत प्रसिद्ध झाले होते. 'मुंबई : द इंटलॅक्च्युअलाइज्ड, २००९'; 'पॉवर, पेन अँड पॅट्रोनेज,२०११; 'कोलॅबोरेटर्स ऑर कन्फर्मिस्ट्स, २०१४' हे त्यांचे या काळातील ग्रंथ बुद्धिवंत, प्राध्यापक आणि पत्रकार या सर्वांसाठी नेहमीच मार्गदर्शक ठरतील यात शंका नाही.

मी सोलापूरला 'लोकमत' आणि 'सकाळ' या दोन्ही दैनिकांच्या संपादकपदावर काही काळ काम केले. डॉ.टिकेकर सोलापूरकर असल्याने त्यांचे निवडक अशा कार्यक्रमांसाठी सोलापूरला येणे व्हायचे. त्या वेळी पुन्हा त्यांच्या गाठीभेटी सुरू झाल्या. सोलापूरच्या शरद सांस्कृतिक प्रतिष्ठानने २००४ साली त्यांना पुरस्कार देऊन गौरविले होते. त्या वेळी मी 'सकाळ'मध्ये त्यांच्यासंबंधी एक लेख लिहिला होता. डॉ. टिकेकरांचे मार्गदर्शक प्राध्यापक जे. व्ही. नाईक यांनी तो लेख वाचून माझे कौतुक केले होते. काहीशा उशिराने टिकेकरांनी मला शाबासकी दिली तेव्हा खरोखर बरे वाटले. 'लोकसत्ता' पुणे आवृत्तीत आणि नंतर काही महिने मुंबई आवृत्तीत काम करताना जोरदार झुरके घेत सिगरेट पिणारे डॉ. टिकेकर आजही आठवतात आणि सोलापूरच्या मुक्कामात मोकळेपणाने बातचीत करणारे, तिथल्या हरिभाई देवकरण प्रशालेचे व त्याचे तत्कालीन मुख्याध्यापक व नंतर एसपीचे प्राचार्य झालेले के. पी. मंगळवेढेकर यांच्याबद्दलही आस्थेने व आदराने बोलणारे टिकेकर डोळ्यांसमोरून जात नाहीत. सोलापूरचे श्रीराम पुजारी आणि टिकेकर यांची भेट पाहणे हा एक दुर्मिळ असा आनंद होता. आज ते सारेच काळाच्या पडद्याआड गेले आहे.

किंकेडने लिहिलेले शिवाजी महाराजांचे चरित्र तीन महिन्यांपूर्वी मी पुण्यातील कँप भागातून विकत घेतले. दुसऱ्या दिवशी टिकेकरांना फोन करून त्याची माहिती दिली. हे पुस्तक मुंबईत कसे आले नाही याची विचारणा त्यांनी केली. त्या पुस्तकाची एक कॉपी घ्यावी व त्यांना पाठवावी अशा विचाराने पुन्हा त्या स्टॉलवर गेलो, पण पुस्तक उपलब्ध नसल्याचे समजले. आता परवा पुन्हा त्या स्टॉलवर गेलो आणि तिथे किंकेडच्या शिवचरित्राच्या काही प्रती दिसल्या व मी हळहळलो. या पुस्तकाची प्रत आपल्याला टिकेकरांना पाठविला आली नाही याची रुखरुख त्या विक्रेत्यापाशी मी व्यक्त केली; पण खरंच ती कधीच संपणारी नाही. कारण ते इतक्या लवकर अखेरचा निरोप घेतील अशी कल्पनाही केली नव्हती.

●

**अरुण खोरे**

चलभाष : ९६०४००१८००



**भावपूर्ण आदरांजली!**

संतसाहित्याचे ज्येष्ठ अभ्यासक रा. शं. नगरकर तसेच बालसाहित्यिक व चित्रकार रमेश मुधोळकर यांचे नुकतेच निधन झाले. त्यांना भावपूर्ण आदरांजली!



विशेष लेख

प्रभा गणोरकर

# मॅगझिनीतून सुटतेय गोळी
# अनोख्या जगाचे दर्शन घडवणारी कविता



*मॅगझिनीतून सुटतेय गोळी*
*जशी या पुस्तकातून माझी कविता...'*

स्वत:च्या हातात असलेल्या शस्त्राचे सामर्थ्य जाणून असलेल्या 'बालिका ज्ञानदेव' या तरुण कवयित्रीची कविता वाचताना माझ्या आकलनाच्या कक्षा विस्तारत असल्याचा अनुभव येत राहिला. पोलिसांची वर्दी घालून एका वेगळ्या नजरेने पाहिलेले आणि अनुभवलेले जग या कवितेत उभे राहते. पहिल्याच कवितेत ही नजर लख्खपणे दिसते. 'बाईला माणसात बसवायला' ज्याने सुरुवात केली त्या जोतिरावतात्यांच्या पुण्यात,

*'ज्या बुधवार पेठेत*
*पोत्यात भरून आणायचे बाईला शिक्षणासाठी*
*तिथं धंद्यासाठी उतरताना बायांच्या गाड्या पाहून*
*चेचून घ्यावेसे वाटतात डोळे...'*

जोतिबांच्या या लेकींकडे बघताना खरे तर पेटून उठायला हवे, पण 'आम्ही? व्यवस्थेच्या भाड्याचे बैल...गुमान निघून जातो माना खाली घालून.'

ही 'वर्दी' आणि त्या वर्दीला चिकटूनच असलेली व्यवस्था हा या कवितेचा गाभा आहे. ही 'वर्दी' आणि त्या वर्दीसोबतच येणाऱ्या जीवनाचे रूप, जीवनाविषयी असणाऱ्या इच्छा-आकांक्षा, आप्तस्वकीयांशी असणारी नाती-गोती; इतकेच नव्हे, आपले स्वत:चे माणूसपण हे सारे सारे नष्ट करून टाकणाऱ्या जगण्याच्या विपरीत तऱ्हेचे चित्रण ही कविता कमालीच्या सरळपणाने, प्रामाणिकपणाने आणि पारदर्शीपणाने करते.

*'त्यांनी हातात दिली काठी*
*आणि उभं केलं गर्दीच्या ठिकाणी गर्दी हटवण्यासाठी*
*म्हणाले, हे काम आहे पोलिसांचं...'*

ही काठी हातात दिल्यानंतर जणू काही सारे संपते... कला, कविता, माणूसपण, शहाणपण...

*'त्यांना पचत नाही माझ्या हातात पाटी नि पुस्तके*
*नि माझ्या मेंदूतलं शहाणपण,*
*त्यांना हवी आहे मी सांगकामी नि हरकामी,*
*किंवा हवी आहे कायम 'छू: कुत्र्या!' म्हणताच*
*कान उभे करणारी.'*

या कवितेतली शेवटची ओळ आहे : 'असं कसं होईल बरं?' हे वाक्य कवयित्रीच्या व्यक्तिमत्त्वावर थेट प्रकाश टाकणारे आहेच, कवितेत उतरणाऱ्या मनाचे स्पष्ट दर्शन घडवणारेही आहे. 'असं कसं होईल बरं' या वाक्यात गर्भित नकार आहे, आव्हान आहे, कणखरपणा आहे, बेधडकपणा आहे, आणि तो 'वर्दी'मुळे आलेला नाही. हा नकार कवयित्रीच्या रक्तातच आहे. तो उच्चारण्याचे धैर्यही तिच्यात मूळचेच आहे. हा नकार आणि तो उच्चारण्याचे धैर्य प्रकट करणाऱ्या अनेक कविता या संग्रहात आढळतात. हे धैर्य जसे व्यवस्थेची चिकित्सा करण्यातून प्रकट होते तसेच ते नात्यांचे पोकळपण दाखवून देतानाही व्यक्त होते. जसे,

*'प्रत्येकजण नातं जोडीत होता माझ्या वर्दीशी*
*पोलिसांशी ओळख वाया जात नाही म्हणून..'*
(पृ.३४)

किंवा, *'माझ्या सख्या, साथी, जीवनसोबती, पती परमेश्वरा!*
*मी माझ्या कर्तव्यार्थ रस्त्यावर आणि तू*





अनुक्रमणिका

*संशयाचं गाठोडं बांधून उभा आहेस माझ्या उरावर...*
*तू मात्र माझी, माझ्या युनिफॉर्मच्या अब्रूची लक्तरं उधळीत*
*असतोस, नित्यनेमानं सगळीकडं...'* (पृ.४१)

किंवा,

*'ज्यांना हवी असतात आमची फळं, पानं,*
*फुलं, आमचं बहरलेपण*
*हवं असतं त्यांच्या गरजेनुसार*
*ज्यांना आमची ड्यूटी, युनिफॉर्म नको असतो*
*ज्यांना लाज वाटते सांगायला, की*
*त्यांच्या बहिणी, बायका, आई पोलिस*
*आहेत म्हणून'* (पृ.५०)

किंवा

*'तू म्हणायचास, आता भेटतोय, बोलतोय*
*नाही गॅरंटी देता येत तू पोलिस झाल्यानंतर...'* (पृ.७३)

अगदी सरळ, साध्या, स्वच्छ आरपार शब्दांत इथे नात्यांचे बदललेले अर्थ व्यक्त होतात. हाच सरळपणा 'वर्दी' हा ज्या व्यवस्थेचा भाग आहे त्या व्यवस्थेचे खरे स्वरूप दाखवतानाही दिसून येतो. 'या हजेऱ्या' (पृ.३६), 'असाच

**बालिका ज्ञानदेव हे तरुण आश्वासक कवींमधले एक महत्त्वाचे नाव. अलीकडच्या काळात तिच्या 'मॅगझिनीतून सुटतेय गोळी' या कवितासंग्रहाची बरीच चर्चा मराठी साहित्यवर्तुळात झाली. पोलिसाची वर्दी घालून एका वेगळ्याच नजरेने पाहिलेले आणि अनुभवलेले विश्व तिने आपल्या कवितांतून मांडले आहे. हे अस्सल वास्तव मनाला भिडणारे आहे.**
**बालिका ज्ञानदेव हिच्या कवितांचे अंतरंग उलगडणारा ज्येष्ठ कवयित्री-समीक्षक प्रभा गणोरकर यांचा हा लेख.**



अर्थ होतो याचा' (पृ.३८), 'तारेवरची कसरत' (पृ.४६), 'साहेब' (पृ.६५) अशा काही कविता उदाहरणादाखल सांगता येतील. व्यवस्थेतील उतरंड, अधिकारशाही, शोषणाच्या तऱ्हा मांडताना कवयित्री अजिबात कचरत नाही.

समाजात पोलिस म्हणून वावरतानाचे अनुभव हेही या 'वर्दी'चे एक रूप आहे. पोलिसांना, विशेषत: वर्दीत जर 'बाई' असेल तर जनतेकडून टवाळक्या, कुचेष्टा हे आहेच. शिवाय वाहतुकीचे नियम मोडून वर अरेरावी करणं (पृ.५१), 'संसद या शब्दाच्या शाईत दाटीवाटीनं बसणाऱ्या मान्यवरांसाठी' तासन्तास पिळवटून घेतलं जाणं, किंवा त्यांच्या कॅनव्हासमध्ये अडकून पडणं, 'पुलिस काय माणसांच्या अवलादी हायत व्हय' (पृ.५८) असे चौकातल्या एखाद्या सोम्यागोम्याने म्हणणे- असेही क्षण असतात. याशिवाय पोलिस असली तरी ती 'बाई' असतेच आणि ते बाईपणही चमत्कारिक अनुभव पदरात टाकते. देवाला 'विटाळ' चालत नसतो म्हणे, पण विटाळात असून देवाजवळ 'बंदोबस्त' करावा लागणे (पृ.५३), कधी तरी रात्री ठाण्यातून दुसऱ्या दिवशी सकाळी 'पॉइंटवर हजर राहण्याचा कॉल' आल्यावर,

*'घराच्या उंबऱ्यापर्यंत आलेला पसारा,*
*चिमुकल्यासाठी डबा*
*नवऱ्याची कुरबूर...हे असतेच.*

किंवा, उन्हाळ्यात, 'भर' उन्हात चौकात उभे राहणे, हिवाळ्यात 'रूक्ष चेहऱ्याने आणि उखणलेल्या ओठांनी' ड्यूटी करणे, पावसाळ्यात पाळीच्या काळातल्या शारीरिक

वेदना दाबून धरणे आणि 'चुकून पडलेले डाग लपवण्यासाठी युनिफॉर्मवर जर्किन घातल्याचे कारण अधिकाऱ्याला काय सांगावे कळत नाही तेव्हा (पृ.६३), पोलिस म्हणून म्हाताऱ्या जर्जर आई-बापांना इकडे सोडून देऊन अमेरिकेत राहणाऱ्या मुलाला पोलिसांच्या मोबाइलवरून मेसेज द्यावा लागतो तेव्हा, 'गेली तीन वर्षं नित्यनेमानं पोटच्या पोरीवर हौस भागवणारा बाप' पाहताना गिऱ्हाईक शोधत रस्त्यावर उभ्या राहणाऱ्या बायका पाहताना आलेले हे दारूण अनुभव किंवा आपली मुलगी 'पोलिस आईची मुलगी' झाल्याच्या जाणिवेने बदललेली पाहताना किंवा 'पायांचे दगड झाले आणि अंगातनं मुंग्या यायला लागल्या तरी चौकातच' उभे राहण्याच्या आज्ञा पाळताना घुसमटलेला जीव (पृ.३८), किंवा पहिल्या गणतीच्या हरेक तालावरून पळताना 'कदम बढाओ'चा आदेश ऐकताना 'बाळा, तू टाकलेलं पहिलं पाऊल आठवतं, त्याचं धावत येणं आठवतं, उलथापालथ होणं आठवतं (पृ.४२).



**मॅगझिनीतून सुटतेय गोळी**
**बालिका ज्ञानदेव**
**लोकवाङ्मय गृह प्रकाशन**
**पृष्ठे : ११८**
**मूल्य : १२० रुपये**

वर्दीच्या आत बाई असते, नव्हे, एक माणूस असते; पण बालिका ज्ञानदेव 'बाई'पणाच्या 'सवलतींची' अपेक्षा मांडीत नाही, त्यासंबंधीची वस्तुस्थिती मांडते. पोलिसांना 'माणूस' म्हणूनही वागवले जात नाही याकडे तिने लक्ष वेधले आहे. 'युनिफॉर्ममधला हलता झुलता माणूस' तिने दाखवून दिला आहे. या माणसाकडे वरिष्ठांचेही लक्ष नसते, किंबहुना दुर्लक्ष असते. 'नाइट राऊंडच्या नावाखाली आम्हाला सतर्क ठेवत, तुम्ही मात्र चारचाकीच्या काचा बंद करून एसी गाडीतच असता पडून, ड्रायव्हरला गाडी फिरवतच ठेवायला सांगत, मुद्दाम आमची गैरहजेरी लावत...

किंवा *'बंदोबस्तात तुम्ही चोख हजर राहून*
*नैसर्गिक विधीसाठी गेल्यावर*
*जेव्हा वरिष्ठ लावील तुमची गैरहजेरी*
*आणि देईल कामात कुचराईचं*
*भलंमोठं लेटर'...* (पृ.४०)

'नोकरी टिकवणं ही तारेवरची कसरत' झालेली आहे, आपले बिरादरीवाले 'अरेरावीच्या गटारात खितपत आहेत-' हे सांगण्याचा नुसता आवाजच इथे फुटलेला नाही, तर दादागिरी करणाऱ्या साहेबांना

*'माणूस म्हणून माणसांशी माणसासारखं*
*नाही राहू शकणार का आपण?'*

असा सवाल करण्याची हिंमतही इथे दिसते, त्याचबरोबर त्याचे परिणाम काय असणार याचीही जाणीव दिसते.

*'मला माहीताय माझा आवाज*
*पचणार नाही त्यांना*
*बसतील कानठळ्या,*
*कदाचित होऊ शकतो घात माझाच*
*माझ्या आवाजानं'...* याप्रमाणे.

आणि, *'असे किती तरी आवाज दाबून ठेवलेत त्यांनी, त्यांच्या व्यवस्थेनं...'*

या संग्रहातल्या शेवटच्या भागातल्या 'मोहिनी मॅडम', 'देवीदास पुंजीरवाड', 'आबा जगताप' या तीन कविता जेवढे सांगतात त्यापेक्षा किती तरी अधिक तीव्र भाष्य करतात. या कविता मुळातूनच वाचण्याजोग्या आहेत. 'वरिष्ठांपासून तुमच्या आसपासचे तरी कुठं होते तुमच्या बाजूनं?' अशा स्थितीत कर्तव्ये पार पाडणाऱ्या मोहिनी मॅडम 'दूध दाटल्या छातीला बाथरूमच्या बेसिनमध्ये मोकळं करून हमसून रडताना जशा दिसल्या, तशीच 'हरॅसमेंट'मुळे गळ्याला फास लावून घेणारा 'देवीदास पुंजीरवाड आणि 'घरातून निघताना सूटबूट घालून निघणारा 'आबा जगताप' ही माणसेही कवयित्रीला हलवून जातात. त्यांच्याशी तिचा मनोमन संवाद चालतो. मोहिनी मॅडमची परवड, देवीदासचे स्वत:ला फास लावून घेणे आणि त्यानंतरची दडपादडपी, आबा जगतापचे 'ऑर्डर्ली' सांगकाम्या म्हणून साहेबांच्या घरी किरकोळ कामे करणे, स्वाभिमान विकणे हे तिला संताप आणणारे ठरते. 'थू तुझ्या जिंदगीवर' अशी तुच्छता ती आबासंबंधी व्यक्त करते.

हा संग्रह वाचताना कवयित्रीचे सळसळते, धगधगते मन ओळीओळींतून प्रकट होते. या संग्रहातील कविता कवयित्रीच्या रोजच्या जगण्यातून उत्स्फूर्त प्रतिक्रियेसारख्या उमलून आलेल्या आहेत. त्यामुळे प्रतिमा, प्रतीके, शब्दकळा, इत्यादी-संदर्भात ती बेदरकार आहे, 'कविता' या 'साहित्यप्रकाराच्या' संस्कारांपासून ती दूर आहे आणि त्या बाबतीत ती पूर्ण बेदखल आहे. पोलिस म्हणून, बाई म्हणून, बायको म्हणून, आई म्हणून, व्यक्ती म्हणून दैनंदिन आयुष्य जगताना जाणवणाऱ्या भावना, मनात येणारे विचार, उद्वेग, निराशा, संताप बेधडकपणे, थेटपणे शब्दांत उतरवणे ही जणू तिची मानसिक गरज आहे आणि त्यामुळे या कवितांचे स्वरूप विशिष्ट झाले आहे. प्रामाणिक, सडेतोड, आरपार पारदर्शी असणे हा या कवयित्रीचा स्वभाव आहे तो तिच्या कवितांमधून प्रतिबिंबित झालेला आहे. पण याचा अर्थ ही कविता विचारांपासून दूर आहे असा नाही. व्यवसायाशी

निगडित असा मूल्यभाव, माणूसपणाशी निगडित अशी संवेदनशीलता, वैयक्तिक स्वभाववैशिष्ट्ये या साऱ्यांचे एकत्रित मिश्रण या कवितांत आढळते. या संग्रहातील कवितांना स्वभावतःच एक धार आहे. त्यांच्यात आवेश, उत्कटता आणि सरळसोटपणा आहे, जो कवयित्रीच्या व्यक्तिमत्त्वातच आहे. एक प्रकारची अस्वस्थता, जगताना लहानसहान गोष्टींमधूनही सतत टोचणी लावणारे अंतर्विरोध, तडफड, उद्वेग, तिखट प्रतिक्रिया, प्रत्युत्तर देण्याचा धर्म, अन्याय सहन न करण्याची वृत्ती हे सारे या कवितांमधून सतत प्रकट होत राहते व त्यामुळे ही कविता इतर कवयित्रींच्या कवितांमध्ये उठून दिसते. एका वेगळ्या 'वर्गा'तून आलेली ही कविता आहे आणि तिचा स्वतःचा असा खास 'वर्ग' आहे.

साहजिकच त्यामुळे बायकांच्या कवितेत असणारे भावुक, हळवे भावविश्व बालिका ज्ञानदेव यांच्या कवितेत आढळत नाही. या संग्रहात एकही 'प्रेमकविता' नाही. 'आई'च्या कष्टाविषयीची एक कविता आहे, पण तिचाही बाज 'हळवा' नाही. 'आई'ला उद्देशून असणाऱ्या 'कशाला दिवा दिलास माझ्या हाती', 'जात', 'सौदा' या कवितांमधले प्रश्न वेगळे आहेत. 'मी विचारलं, चालेल का जातीबाहेरचा जोडीदार, तर म्हणाली होतीस, 'जित्ती गाडीन तुला...' एकूणच, या कवयित्रीचे जीवनसंघर्ष वेगळे आहेत. नवरा, मुले, प्रियकर असे ते चाकोरीतले जग आणि तेच चौकटीतले चेहरे इथे आढळत नाहीत. मध्यमवर्गीय मुखवट्याचे दुःख, मळमळ, नैराश्य, जीवनविषयक 'तत्त्वज्ञाना'चा आविर्भाव या सर्व लळ्यालोंब्यांना कवयित्रीच्या जगात थारा नाही. चांगल्या अर्थाने ही कवयित्री मध्यमवर्गीय संवेदना, भावना, विचार करण्याची पद्धती, संस्कार यापासून 'मुक्त' आहे. जशी ती मध्यमवर्गीय स्त्रियांच्या कवितेच्या संस्कारांनी पछाडलेली नाही तशीच स्त्रीमुक्तीच्या घोटवलेल्या किंवा चटकन आत्मसात करता येऊ शकणाऱ्या अवडंबरापासूनही ती दूर आहे. स्त्रीवरचे अन्याय, तिचे शोषण, तिची फरफट, पुरुषांकडून होणारा शारीर-मानसिक छळ हे तिच्या अनुभवातले आहे, पण ते अस्सल, प्रत्यक्ष भोगलेले आहे याचा प्रत्यय ही कविता देते. 'जेव्हा जमीन, हवा, पाणी आणि आपल्याला जोपासणारेही असतात आपल्याच विरोधात उभे, तेव्हा कळत नाहीय, कुणाला जवळ धरावं आणि कुणाला सोडावं..' (पृ. १०२) इतके साधे, सरळ, नेमके, 'दाखवेपणा'पासून मुक्त, अनलंकृत आणि तरीही भिडणारे क्वचित वाचायला मिळते. ●

प्रभा गणोरकर
चलभाष : ९५४५४६१७३७

बालिका ज्ञानदेव
चलभाष : ९५२७१९२९२९



लेख

विलास खोले



# महर्षी कर्वे यांचे महनीय कार्य

■■

स्त्रियांच्या शिक्षणासाठी आयुष्य वेचणाऱ्या महर्षी कर्वे यांचे डॉ. विलास खोले लिखित 'महर्षी धोंडो केशव कर्वे' हे चरित्र अलीकडेच 'मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस'तर्फे प्रकाशित झाले आहे.

या चरित्रातील एक संपादित अंश इथे प्रसिद्ध करीत आहोत.

■■



महर्षी धोंडो केशव कर्वे यांना १०४ पूर्ण वर्षांचे आयुष्य लाभले. एवढे दीर्घ आयुष्य आणि तेही क्रियाशील स्वरूपाचे लाभणे हा भाग्ययोगच म्हणावयास हवा. हे भाग्य ज्याप्रमाणे कर्वे यांच्या वाट्याला आले त्याचप्रमाणे कर्वे महाराष्ट्रात जन्माला आले आणि त्यांचे कार्यही येथेच घडले हे महाराष्ट्राचे भाग्य होय. शंभर वर्षांचा रोमहर्षक कालखंड कर्वे यांना अनुभवता आला. ते जन्माला आले तेव्हा १८५७ सालचे स्वातंत्र्ययुद्ध होऊन जेमतेम वर्ष होत आले होते. त्यांच्या जन्माला सहा महिने उलटून गेल्यानंतर 'राणीचा जाहीरनामा' प्रसिद्ध झाला. ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारामुळे आणि काहीशा अतिरेकी वागण्यामुळे देशात उत्पन्न झालेला असंतोष मर्यादित प्रमाणात का होईना, कमी व्हावा आणि इंग्रजी राज्याची घडी नीट बसावी या हेतूने राज्यकर्त्यांनी सबुरीचे व काही अंशी समजुतदारपणाचे धोरण स्वीकारले होते. अधिकाऱ्यांचे वागणे जाचक होऊ नये याकडे प्रशासकांनी लक्ष पुरवावे अशी अपेक्षा राणीने ठेवली होती. राणीच्या जाहीरनाम्यानंतर इंग्रजांनी या देशातील धार्मिक आचारविचारांत अकारण ढवळाढवळ न करण्याचा व समाजाचा व्यर्थ रोष ओढवून न घेण्याचा पवित्रा घेतला.

एकदा राजवट स्थिरावल्यानंतर इंग्रजांनी स्वतःचे शिक्षणविषयक धोरण अमलात आणायला सुरुवात केली. वुडचा खलिता, मेकॉलेचे शिक्षणविषयक धोरण आणि माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनचे दूरदर्शी वर्तन या सर्वांचा एकत्रित परिणाम घडून महाराष्ट्रात शिक्षणाची नवी पठडी सुरू झाली. १८५७ मध्ये मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली आणि पुढे यथाकाल पदवीधरांची पहिली तुकडी बाहेर पडावयाची होती. मिल, स्पेन्सर, रूसो, लॉक इत्यादिकांच्या तत्त्वविचारांचा परिचय होऊ लागल्यामुळे वैचारिक कलहाला सुरुवात झाली होती. समाजातील सर्वांत उपेक्षित अशा स्त्रीवर्गाची दुःस्थिती चर्चेचा विषय होऊ लागली होती. सुशिक्षित तरुणवर्गात समाजसुधारणेचे विचार मूळ धरू लागले होते. लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख आणि महात्मा जोतिराव फुले यांच्या क्रांतिकारक विचारप्रतिपादनामुळे समाजात विचारमंथन सुरू झाले होते. थिओडर पार्कर या अमेरिकन विचारवंताच्या प्रभावाने सर्वस्वी भिन्न अशी विचाराची व कृतीची प्रेरणा जोतिराव फुले यांना मिळाली होती. मुलींच्या शिक्षणासाठी एकापाठोपाठ एक अशा शाळा काढण्याचे जोतिराव फुले यांचे प्रेरणादायी कार्य स्त्रीशिक्षणाला चालना देऊ







लागले होते. ऑगस्ट १८४८ मध्ये बुधवार पेठेतील भिड्यांच्या वाड्यात फुले यांनी पहिली शाळा सुरू केली. ती बंद पडलेली पाहून ३ जुलै १८५१ रोजी बुधवार पेठेत चिपळूणकरांच्या वाड्यात, १७ सप्टेंबर १८५१ रोजी रास्ता पेठेत आणि १५ मार्च १८५२ रोजी वेताळ पेठेत अशा तीन शाळा त्यांनी काढल्या. जोतिरावांनी मुलींची शाळा काढली तीच मुळी कर्वे यांच्या जन्माच्या दहा वर्षे आधी. जोतिरावांचे द्रष्टेपण निर्विवाद सर्वमान्य आहे. त्यांचे शिक्षणक्षेत्रातील कार्य पायाभूत स्वरूपाचे आहे यात शंका नाही. घरचा विरोध सोसून त्यांनी सावित्रीबाईंना शिकवले आणि मुलींची शाळा चालविण्याइतके सक्षम बनवले. इतकेच नव्हे, तर स्वतःच्या सामाजिक कार्यात सहभागी करून घेतले. सावित्रीबाईंनी इतक्या निष्ठेने हे कार्य केले, की जोतिरावांच्या आजारपणात व पुढेही स्वतंत्रपणे अडचणीत सापडलेल्या स्त्रियांना मार्गी लावण्याचे त्यांचे व्रत सुरूच राहिले. असे असले तरी कर्वे यांच्या कार्याचे महत्त्व कमी होत नाही.

जाणीवपूर्वक कार्यक्षेत्राची निवड करणे आणि निवडलेल्या कार्यक्षेत्रासाठी आयुष्यभर स्वतःला वाहून घेणे हे महापुरुषाच्या व्यक्तिमत्त्वाचे एक लक्षणच आहे. ते कर्वे यांच्या ठिकाणी कोणालाही सहज दिसू शकेल. त्यांच्या कार्याची पाच वेगवेगळी अंगे सांगता येतात. विधवा पुनर्विवाहाचे प्रयत्न, विधवा शिक्षणासाठी केलेली धडपड, स्त्रीशिक्षणासाठी केलेले संस्था-प्रस्थापनेचे कार्य, ग्रामशिक्षणाकडे त्यांनी पुरवलेले लक्ष आणि अखेर समता संघाची स्थापना करून विश्वात्मक ऐक्याचा मांडलेला विचार ही ती पंचांगे होत.

हिंदू समाजातील एकंदर स्त्रीवर्गाची स्थितीच इतकी वाईट होती की ती सुधारण्यासाठी जेवढी म्हणून माणसे काम करू लागली तेवढी कमीच पडणार होती. दुसरे असे, की कर्वे ज्या जातीत जन्माला आले त्या चित्तपावन कोकणस्थ ब्राह्मण समाजात रूढिप्रामाण्य प्रचंड प्रमाणावर होते. या समाजातील विधवांना पुनर्विवाह करण्याची सक्त मनाई होती. बालविधवांचा प्रश्न तर अधिकच उग्र स्वरूपाचा होता. कारण बालवयातील वैधव्य हे पूर्वजन्मीच्या पापकर्मांशी जोडले जात असे. त्यामुळे अजाण बालिकांचे हाल हाल होत. अशा परिस्थितीत पहिली पत्नी निवर्तल्यानंतर विधवेशीच पुनर्विवाह करावयाचा कर्वे यांचा निश्चय केवळ क्रांतिकारक स्वरूपाचा होता. तसा पुनर्विवाह केल्याचे शासन त्यांना भोगावे लागले. ज्या मुरूड गावच्या कल्याणासाठी त्यांनी काम केले होते त्या मुरूडच्या ग्रामस्थांनीच त्यांच्यावर संपूर्ण बहिष्कार टाकला. परंतु अशा प्रतिकूलतेवर मात करून कर्वे यांनी आरंभी विधवा पुनर्विवाहाचे कार्य करणारी संस्था स्थापन केली आणि पुढे स्त्रीशिक्षणाला आजन्म वाहून घेतले. स्त्रियांना शिक्षण लाभावे, त्यांना समाजात मानाचे स्थान लाभावे, त्यांच्यात आत्मसन्मानाची भावना जागी व्हावी यासाठी त्यांनी सगळे प्रयत्न केले. कर्वे यांच्या दृष्टीने स्त्रियांच्या उन्नतीसाठी ते करीत असलेले प्रयत्न हे राष्ट्रकार्यच होते. स्वराज्यप्राप्तीच्या वेगवेगळ्या आंदोलनांपासून ते तसे अलिप्त होते, याचा अर्थ त्यांनी स्वातंत्र्याकडे पाठ फिरविली होती असे नाही. त्यांनी निवडलेले शिक्षणाचे क्षेत्र हे स्वराज्यप्राप्तीच्या विविध प्रयत्नांचे एक अंगच होते.



महर्षी धोंडो केशव कर्वे
विलास खोले
मॅजेस्टिक पब्लिशिंग हाऊस
पृष्ठे : २५८
मूल्य : ३०० रुपये

कर्वे स्वतः महाविद्यालयात शिकत असताना त्यांनी जे वाचन केले, नरहरपंत जोशी या मित्राबरोबर जो विचारविनिमय केला आणि पुढे फर्गसन महाविद्यालयात गेल्यानंतर त्याचा परिणाम त्यांच्या मनातील विचारांना प्रत्यक्ष कार्यान्वित करण्यात झाला. शिक्षण संपल्यानंतर यथावकाश कर्वे गणिताचे प्रोफेसर झाले. वेगवेगळ्या तत्त्वज्ञानपर, विज्ञानपर पुस्तकांची त्यांनी भाषांतरे केली. या कामांत ते यशस्वी ठरले. तरीही त्यातच रमावे आणि प्राध्यापकाचे स्वास्थ्यपूर्ण जीवन जगावे असा मोह त्यांना पडला नाही. बुद्धिमत्तेच्या जोरावर संपत्तीची साधना करणे शक्य असतानाही आणेपैची उठाठेव करून विधवा पुनर्विवाहाच्या कार्यासाठी सरसावून पुढे व्हायचे, दोनचार विद्यार्थिनींपासून

आरंभ करून स्त्रीशिक्षणाच्या कामाला वाहून घ्यायचे, हे त्यांचे वागणे असामान्यच होते. 'पैसे मिळवून घरदार करावे अगर चैन भोगावी, असा विचार क्षणभरही मला शिवला नाही' (कर्वे-पटवर्धन, पृ.९२). अशी मानसिकता त्या काळी व सर्वकाळी केवळ अपवादात्मक स्वरूपाची म्हणावी लागते. वरवर पाहता कर्वे यांनी चिपळूणकर-टिळक-आगरकर यांच्यासारखे असाधारण वर्तन पंचविशी-तिशीपर्यंत केले नाही. ज्याला विशिष्ट ब्राह्मणी म्हणावे असेच त्यांचे वर्तन वाटू शकते. परंतु त्यांचे वेगळेपण केवळ काटकसरीने राहण्यात नाही, समाजकार्य करण्यासाठी आपले पैसे वापरण्यात नाही, तर स्त्रीशिक्षणाच्या कार्याला पवित्र धर्मकार्य मानण्यात आहे. त्यांची कार्यनिष्ठा इतकी प्रखर की तीसाठी त्यांनी इतर सगळ्याच गोष्टी गौण मानल्या. नि:स्वार्थ स्त्रीशिक्षणाचा कृतनिश्चय त्यांनी कधी सोडला नाही. या कार्याला सर्वस्वभावनेने वाहून घेणाऱ्या स्त्री सहकारी मिळाव्यात असा त्यांचा कायम प्रयत्न होता. १९१६ मध्ये अखिल भारतवर्षीय महिला विद्यापीठाची कर्वे यांनी केलेली स्थापना ही केवळ स्त्रीशिक्षणाच्याच संदर्भात नव्हे तर एकंदर स्त्रियांच्या प्रगतीच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण सुरुवात होती.

स्त्रियांच्या उद्धाराच्या कल्पनांनी व त्यासाठी चाललेल्या प्रयत्नांनी प्रभावित झालेले आणि इंग्रजांच्या परकी सत्तेला प्रतिकार करणाऱ्या टिळकांच्या विचारांनी भारावून गेलेले असे दोन तट समाजात पडले होते. गोपाळ कृष्ण गोखले आणि गोपाळ गणेश आगरकर यांच्या सान्निध्याचा कर्वे यांच्या मनावर खोलवर परिणाम झाला. आगरकर-टिळकांच्या कलहात कर्वे आगरकरांच्या बाजूचे होते आणि कर्वे यांच्या पुनर्विवाहाच्या प्रकरणात आगरकर त्यांच्या पाठीशी होते, असा हा समसमा संयोग कर्वे यांच्या आयुष्याला वळण लावायला कारणीभूत ठरला. सुधारणावाद्यांचा आग्रह आधी सामाजिक सुधारणा केल्या पाहिजेत असा होता आणि सुधारणांसाठी त्यांना शिक्षणाचे माध्यम हे उपयुक्तच नव्हे तर मूलभूत वाटत होते. धोंडो केशव कर्वे या विचाराशी पूर्णपणे सहमत होते. शिक्षण हाच सामाजिक सुधारणेचा प्रभावी उपाय आहे हे त्यांना मनोमन पटले होते आणि त्यांनी आपले विचार व दृष्टिकोन संस्थात्मक व वैयक्तिक पातळीवर अमलात आणायला आरंभ केला. विधवाविवाह आणि स्त्रीशिक्षण या कार्यांचे ते संघटक बनले. विधवांना समाजात सन्मानाचे स्थान लाभावे, स्वावलंबी होता यावे व त्यांच्या पुनर्विवाहाचा मार्ग मोकळा व्हावा यासाठी त्यांनी प्रचंड परिश्रम केले. त्यांचे हे प्रयत्न त्यांच्या आयुष्यभराच्या आस्थेत, स्त्रीशिक्षणविषयक विविध उपक्रमांत परिणत झाले. हे शिक्षण जेवढे शक्य तेवढे व्यवहारोपयोगी होईल अशीही त्यांची दृष्टी होती.

आज एकविसाव्या शतकातही विधवा स्त्रियांचा जो बहुविध छळ होतो, त्यांचे सर्व पातळ्यांवर जे शोषण होते, त्यासंबंधी वारंवार प्रसिद्ध होणारे राष्ट्रीय व जागतिक अहवाल पाहिले म्हणजे ज्या काळात अण्णासाहेब कर्वे यांनी विधवा स्त्रियांसाठी जे कार्य सुरू केले व नेटाने चालवले त्याचे मोल व महत्त्व पटते. आधुनिक भारतीय स्त्रिया एकीकडे पुरुषांच्या बरोबरीने प्रगतिपथावर वाटचाल करीत असतानाच दुसरीकडे स्त्री-पुरुषसंख्येचा समतोल ढासळत चालल्याचे आणि स्त्रीभ्रूणहत्येचे प्रमाण व स्त्रीसंबद्ध हिंसा यांत वाढ झाल्याचे चित्र दिवसेंदिवस स्पष्ट होत चालले आहे. स्त्रियांकडे पाहण्याची एकंदर समाजाची अनुदार वृत्ती वाढत चालल्याचेच हे द्योतक आहे. कर्वे यांच्या जन्माला दीडशे वर्षे होऊन गेल्यानंतर आणि त्यांच्या मृत्यूला पन्नास वर्षे होऊन गेल्यानंतर ही परिस्थिती आहे. ती पाहिली म्हणजे स्त्रियांविषयीचा जो कळवळा कर्वे यांच्या अंत:करणात त्या काळी उत्पन्न झाला तो अतुलनीय होता असेच म्हणावे लागते. स्त्रियांच्या उन्नतीसाठी आपले आयुष्य वाहून घेणाऱ्या आणि निर्मोहीपणाने अन्य कुठल्याही कार्याकडे-क्षेत्राकडे न वळणाऱ्या कर्वे यांचे मोठेपण आजही अबाधित आहे.

कर्वे यांच्या संस्थेत जी माणसे शिकली त्यांच्यावर कर्व्यांच्या नि:स्वार्थ सेवेचे प्रगाढ संस्कार झाले. सगळ्याच व्यक्ती काही अण्णासाहेबांच्या सहकारी म्हणून काम करीत राहिल्या असे नाही, तथापि त्यांपैकी अनेकजणींनी वेगवेगळ्या स्वरूपाची समाजहिताची कामे केली. एक अतिशय चांगले उदाहरण सांगायचे तर सिंधुताई अंबिके यांचे सांगता येईल. वयाच्या बाविसाव्या वर्षी त्यांना वैधव्य आले. त्या वेळी त्या सहावी शिकल्या होत्या. त्यानंतर त्या हिंगण्याला आल्या व अभ्यास करून त्यांनी सातवीची परीक्षा दिली. त्या व्हर्नाक्युलर फायनल झाल्या आणि नंतर त्या ताराबाई मोडक यांच्या कोसबाडच्या कार्यात सहभागी झाल्या. त्यांनी उत्तरायुष्यात लिहिलेले वटवृक्षांच्या सावलीत (यश:श्री, पुणे २००५) हे आत्मवृत्त शिक्षणविषयक उपक्रमशीलता, कल्पकता व नि:स्वार्थ कार्यप्रवृत्ती या दृष्टीने वाचण्याजोगे आहे. शिकवण्यासाठी त्यांनी वेगवेगळे प्रयोग केले आणि अनेक विद्यार्थी घडवले. कोणताही गाजावाजा न करता अशी कामे कर्वे यांच्या अनेक विद्यार्थिनींनी केली. इतिहासात त्यांचा साधा नामोल्लेखही नसला तरी त्या

सगळ्याचे श्रेय अण्णासाहेबांच्या ध्येयनिष्ठ प्रेरक व्यक्तिमत्त्वाकडे जाते हे नि:संशय. त्यामुळे महर्षी धोंडो केशव कर्वे यांना अंबिक्यांनी दिलेली वटवृक्षाची उपमा अत्यंत चपखलपणे बसते

कर्वे यांच्या कार्याचे एक अंग जसे शैक्षणिक स्वरूपाचे तसे दुसरे अंग सामाजिक स्वरूपाचे आहे. त्यांच्या कार्यामुळे आरंभकाळात जरी ब्राह्मण स्त्रियांना शिक्षणाची वा विवाहाची संधी मिळाली असली तरी यथावकाश सर्व जातींच्या स्त्रियांना कर्वे यांच्या कार्याचा लाभ घडला. कर्वे यांच्या उत्तरायुष्यात ब्राह्मण विद्यार्थिनींइतक्या अन्य जाती-जमातींच्या विद्यार्थिनी शिकू लागल्या. त्यापुढील काळात तर महाराष्ट्रातील अनेक बागाईतदार, जमीनदार, मंत्री, आमदार इत्यादिकांच्या घरातील स्त्रियांना त्यांच्यावरील सर्व कौटुंबिक व पारंपरिक बंधने व संकेत सांभाळून कर्वे यांच्या संस्थांतील वसतिगृहांत राहून सुरक्षितपणे सुशिक्षित होण्याची संधी कर्वे यांनी स्थापन केलेल्या संस्थांमुळेच मिळाली. हा लाभ केवळ बहुजन समाजातील उच्चस्तरीय स्त्रीवर्गापुरता मर्यादित राहिला नाही. अगदी गरीब, मोलमजुरी करणाऱ्या स्त्रियांच्या मुलीबाळींनाही बहुसंख्येने महिला विद्यापीठाचा व इतर संस्थांचा लाभ होऊ लागला असा इतिहास आहे. अलीकडे मात्र कर्वे यांनी शिक्षणसंस्थांची स्थापना कशासाठी केली होती, कोणत्या स्थितीतल्या विद्यार्थिनी त्यांच्यापुढे होत्या, त्यामागे केवढी व्यापक दृष्टी होती या गोष्टीचा स्वत:च्याच प्रतिष्ठेत रमलेल्या, विद्यापीठाच्या तथाकथित उच्चशिक्षित तालेवार अधिकाऱ्यांना आणि त्यांच्या तालानुसार वागणाऱ्या अन्य संस्थाप्रमुखांना विसर पडू लागलेला दिसतो.



**कर्वे यांच्या कार्याचे एक अंग जसे शैक्षणिक स्वरूपाचे तसे दुसरे अंग सामाजिक स्वरूपाचे आहे. त्यांच्या कार्यामुळे आरंभकाळात जरी ब्राह्मण स्त्रियांना शिक्षणाची वा विवाहाची संधी मिळाली असली तरी यथावकाश सर्व जातींच्या स्त्रियांना कर्वे यांच्या कार्याचा लाभ घडला. कर्वे यांच्या उत्तरायुष्यात ब्राह्मण विद्यार्थिनींइतक्या अन्य जाती-जमातींच्या विद्यार्थिनी शिकू लागल्या.**



अण्णासाहेब कर्वे यांनी केलेले महिला विद्यापीठाच्या स्थापनेचे कार्य आणि रवीन्द्रनाथ टागोर यांनी केलेली 'शांतिनिकेतन'ची उभारणी यामागे दोघांतील वृत्तिसाम्याचा प्रत्यय येतो. केवळ पाच विद्यार्थिनींना बरोबर घेऊन महिला विद्यापीठ सुरू झाले. रवीन्द्रनाथांच्या 'शांतिनिकेतन'ची सुरुवात तर केवळ दोन विद्यार्थ्यांच्या बळावरच झाली. कर्वे यांना आपल्या कार्यासाठी पैशाची अखंड चणचण जाणवत राहिली आणि अर्थसाहाय्यासाठी ते झोळी पसरून कायम फिरत राहिले. आपले व इतरांकडून गोळा केलेले जितके जास्तीत जास्त पैसे शिक्षणकार्याला देता येतील तितके देण्याचा प्रयत्न त्यांनी आजीवन केला. टागोरांनाही 'शांतिनिकेतन'च्या कार्यासाठी फार मोठ्या आर्थिक अडचणींना तोंड द्यावे लागले. कर्वे व टागोर दोघांनीही शिक्षणप्रक्रियेत मातृभाषेला केंद्रस्थान दिले. महिला विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधीची आपली कल्पना कर्वे यांना टागोरांना कळवावीशी वाटली आणि टागोरांनीही लगेच पत्रोत्तर पाठवून कर्वे यांच्या संकल्पाचे स्वागत केले हे त्यांच्या मनोधर्मातील साधर्म्यांचेच द्योतक म्हणता येईल.

अर्थात कर्वे व टागोर यांच्या आचारविचारांतील साम्य याहून अधिक नाही. टागोर हे प्रतिभावंत होते, सौंदर्याचे उपासक होते, कलेचे मर्मज्ञ होते. कर्वे एकमार्गी, साहित्यकलांमध्ये फारशी रुची नसणारे आणि शिक्षणकार्यापलीकडे अन्य कशाचाही विचार न करणारे होते. टागोरांचा जीव माणसांमध्ये गुंतत असे. याउलट, अण्णासाहेब कर्वे कुटुंबातल्या वा कुटुंबाबाहेरच्या कुठल्याही माणसांत कधीही गुंतले नाहीत. अर्थात त्यांच्या वागण्यात तिळमात्र कोतेपणा नव्हता हे त्यांनी केलेल्या कामांवरून सिद्ध होते. ध्येयपूर्तीला भावनिक बंधनांची अटक पडावी हे त्यांना कधीही मानवले नाही. त्यांचे थोरले चिरंजीव रघुनाथराव हे मुंबई येथे निधन पावले. ती बातमी ऐकल्यानंतर कर्वे उद्गारले, ''आता त्याचं वय झालेलं होतं. प्रकृतीही बरी नव्हती. एक दिवस माणूस जायचंच.'' कुटुंबीयांविषयी त्यांची वृत्ती 'जैसी गोरुवे रुखाखाली बैसली' अशा तऱ्हेची आहे (कर्वे इरावती, १९६०, पृ. ५६).

ठाकरसी मंडळींशी समेट झाल्यानंतर कर्वे विद्यापीठाच्या महत्त्वाच्या अनेक समित्यांवर होते; परंतु त्यांनी कधी तेथील चर्चांमध्ये भाग घेतला नाही की मतप्रदर्शन केले नाही, मग एखाद्याच्या बाजूने बोलणे तर दूरच. कमलाबाई देशपांडे यांच्यावर सव्वीस हजार रुपयांचा घोटाळा केल्याचा



अनुक्रमणिका



**प्रदीर्घ काळ स्त्रीशिक्षणविषयक कार्य केल्यानंतर धोंडो केशव कर्वे अधिक व्यापक कार्याकडे वळले. त्यासाठी महाराष्ट्र ग्राम-प्राथमिक शिक्षण मंडळ ही संस्था त्यांनी काढली व बारा वर्षे तिच्यामार्फत ग्रामशिक्षणाचे कार्य केले. एवढ्यावरच न थांबता, वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षी त्यांनी 'समता संघ' स्थापन केला. जातीजातींमधील भेदाभेद दूर व्हावेत, इतकेच नव्हे, तर सर्व मानव एकच आहेत, ही भावना समाजात रुजावी असा प्रयत्न आपल्या मर्यादित शक्तीच्या साहाय्याने त्यांनी केला.**



विद्यापीठाने आळ घेतला. कमलाबाईंचे वर्तन धुतल्या तांदळासारखे स्वच्छ आहे हे पूर्णपणे ठाऊक असूनही कर्वे सेनेटच्या व सिंडिकेटच्या मीटिंगमध्ये त्यांच्या बाजूने एक वाक्यदेखील बोलले नाहीत. वा. म. जोशी प्राचार्य असताना कॉलेजातील काही कारस्थानी मंडळींनी त्यांच्याविरुद्ध लेडी ठाकरसींचे व विद्यापीठाच्या अन्य काही पदाधिकाऱ्यांचे कान फुंकले होते. त्यामुळे सिंडिकेटमध्ये त्यांच्यासंबंधी चर्चा होणार होती. या सर्व प्रकाराचा वा. म. जोशी यांना अतिशय मानसिक त्रास झाला आणि त्यानंतर त्यांचे देहावसान झाले. वा. म. जोशी यांच्यासंबंधीदेखील अण्णासाहेब कर्वे विद्यापीठात एक अक्षरही बोलले नाहीत. त्यांचे असे वागणे जवळच्या मंडळींना अनाकलनीय वाटे. त्यांच्या तटस्थ वृत्तीचा हा कळस म्हणता येईल.

विद्यापीठावर व आश्रमाच्या आजन्म सेवकांवर आलेले संकट दूर झाल्यानंतर अण्णासाहेबांना अतिशय हायसे वाटले. वेगवेगळ्या संकटांना, विशेषत: लहान-मोठ्या आर्थिक प्रश्नांना तोंड देण्याची सवय अण्णासाहेबांना लहानपणापासूनच होती. त्यामुळे ते कधीही डगमगले नाहीत किंवा विचलित झाले नाहीत. ज्या धीरोदात्तपणे त्यांनी वृद्धावस्थेत विद्यापीठावर आलेल्या संकटाला तोंड दिले ते धैर्य व मनाची समधात वृत्ती अतुलनीय म्हणावी अशीच होती. उर्वरित आयुष्यात त्यांनी विद्यापीठाच्या कारभारात पुन्हा हस्तक्षेप केला नाही. त्यांच्याकडून ज्या काही साहाय्याची अपेक्षा असेल तेवढे साहाय्य त्यांनी केले, परंतु ठाकरसी मंडळींविषयी कोणतीही कटुता त्यांनी मनात बाळगली नाही. त्यांच्या पत्नी बाया कर्वे यांनी त्यांच्या कार्यात अतिशय मोलाची साथ दिली. आपल्या नवऱ्याचा स्वभाव कसा आहे हे त्या चांगले ओळखून होत्या. प्रवेशासाठी शाळेत गेल्यानंतर 'हिला वरच्या वर्गात घ्या' असे शब्ददेखील ज्याने उच्चारले नाहीत किंवा आपल्या मुलांसाठी चार बापांप्रमाणे जो कधीही धडपडला नाही त्याच्याकडून कौटुंबिक पातळीवरही कुठल्याच अपेक्षा करणे योग्य ठरणार नाही हे त्यांनी मनोमन जाणले होते. त्यामुळे मुलांसाठी ज्या काही अत्यावश्यक गोष्टी त्या सर्व बाया कर्वे यांनीच केल्या.

प्रदीर्घ काळ स्त्रीशिक्षणविषयक कार्य केल्यानंतर धोंडो केशव कर्वे अधिक व्यापक कार्याकडे वळले. त्यासाठी महाराष्ट्र ग्राम-प्राथमिक शिक्षण मंडळ ही संस्था त्यांनी काढली व बारा वर्षे तिच्यामार्फत ग्रामशिक्षणाचे कार्य केले. एवढ्यावरच न थांबता, वयाच्या पंचाऐंशीव्या वर्षी त्यांनी 'समता संघ' स्थापन केला. जातीजातींमधील भेदाभेद दूर व्हावेत, इतकेच नव्हे, तर सर्व मानव एकच आहेत, ही भावना समाजात रुजावी असा प्रयत्न आपल्या मर्यादित शक्तीच्या साहाय्याने त्यांनी केला. सर्व जगाचे एकच केंद्रवर्ती शासन असावे, म्हणजे सर्व माणसे आनंदाने व परस्परसद्भावाने जगू शकतील, अशा भावनेपर्यंत त्यांची वैचारिक झेप पोचली. अवतीभवतीच्या दु:खी स्त्रियांचे दु:ख दूर करण्याच्या प्रयत्नापासून जागतिक एकात्मतेपर्यंतच्या त्यांच्या विचारांचा व कार्याचा झालेला प्रवास पाहिला म्हणजे आपल्या दीर्घायुष्याचे त्यांनी सर्वार्थाने सार्थक केले असे म्हणता येते.

महर्षी धोंडो केशव ज्या कर्वेकुलात जन्माला आले त्या कुलाचा पूर्वेतिहास वैभवशाली असला तरी त्यांच्या वडिलांच्या बालपणापासून कर्वे यांच्या घरात दारिद्र्य व आर्थिक अडचणी होत्या. त्यांचे आई-वडील शीलवान होते, परंतु कर्वे यांचा जीवनमार्ग सुखकर व श्रेयस्कर होईल अशी कोणतीही स्थिती नव्हती. प्रतिकूल परिस्थितीशी झगडतच त्यांना आपले ध्येय गाठावे लागले. त्यांचा स्वभाव भिडस्त व मध्यममार्गी होता. शक्यतोवर कोणाला न दुखावता इष्ट ते करावे अशी त्यांची पद्धती होती. सामाजिक सुधारणेच्या

बाबतीतही कमी महत्त्वाच्या गोष्टींची तें फारशी चिकित्सा करीत नसत. उदा. सोवळे नेसणे, श्रावणी करणे यांसारख्या बाबतीत ते कोणाला दुखवीत नसत, तथापि मुख्य मुद्द्यापासून किंवा तत्त्वापासून ते कधीही विचलित होत नसत : ''ज्यात खरी सुधारणा आहे व ज्याच्या आवश्यकतेबद्दल त्यांची एकदा बालंबाल खात्री झाली आहे ती गोष्ट कितीही अडथळे आले तरी करावयाला ते कदापि कमी करावयाचे नाहीत'' (कर्वे-पटवर्धन, उपोद्घात, पृ.२३).

आपल्या वागणुकीने वडीलमाणसांना कोणत्या प्रसंगी प्रसन्न ठेवावे व कोणत्या प्रसंगी कोणाची भीड न बाळगता आपणा स्वत:ला योग्य वाटेल तसेच वागावे याबद्दल ते व्यवहारी होते. ''ओवळ्याने जेवायला बसणे, किंवा इराण्याच्या दुकानात चहा घ्यावयाला जाणे, या किंवा अशाच दुसऱ्या गोष्टींमुळे जर वडिलांचे मन दुखत असेल तर त्या गोष्टी करू नयेत... पण बायकोला शाळेत पाठविणे, पुनर्विवाह करणे, लहानपणी मुळीच लग्न न करणे किंवा मोठेपणी लहान मुलीशी लग्न करणे'' या बाबतीत मात्र आपल्याला जो मार्ग योग्य दिसेल तो स्वीकारावा असे ते मानत (कर्वे-पटवर्धन, उपोद्घात, पृ. २४). कर्वे यांच्या मोठेपणाचे रहस्य सांगताना र. पु. परांजपे यांनी लिहिले आहे ते लक्षात ठेवण्याजोगे आहे : ''सामान्य माणसांच्या मानाने त्यांची बुद्धी पुष्कळच तीव्र होती, परंतु नुसत्या बुद्धिमत्तेच्या जोरावर त्यांच्या हातून जे कार्य घडले ते खचित घडले नसते. बुद्धीपेक्षाही जास्त मौल्यवान असे ध्येयनिष्ठा, चिकाटी, साधेपणा, निर्दोष चारित्र्य, नि:स्वार्थीपणा, पैशांच्या व्यवहारांतील चोखपणा व सर्वांशी मिळून-मिसळून व त्यांस न दुखावताना त्यांजकडून काम करून घेण्याची हातोटी, हे गुण त्यांच्यामध्ये अतिमोठ्या प्रमाणात होते व त्यामुळेच त्यांच्या हातून एवढे मोठे कार्य घडले व शेवटी भारतातील मुख्य रत्नांमध्ये त्यांचे नाव गोवले गेले'' (कर्वे-पटवर्धन, उपोद्घात, पृ.२६).

न्या. रानडे यांचा उदारमतवादी समाजसुधारणा विचार, गोपाळ गणेश आगरकर यांचा आमूलाग्र सुधारणा विचार आणि गोपाळ कृष्ण गोखले यांचा भारत सेवक समाज यांचा परिणाम महर्षी कर्वे यांच्या विचारविश्वावर व कृतीवर झाला. रानडे-भांडारकरप्रभृतींनी चालविलेले स्त्रीशिक्षणाचे प्रयत्न त्यांनी पाहिले होते. राजकारण हा आपला पिंड नाही हे जाणून ज्या काळात स्वातंत्र्याची चळवळ हा बहुसंख्य समाजधुरीणांचा अग्रक्रम होता, त्या काळात विधवा दु:स्थितिनिवारण आणि स्त्रीशिक्षण हे आपले जीवितकार्य निश्चित करून कर्वे यांनी आपले दीर्घायुष्य कारणी लावले. स्त्रीजीवनाचे पारंपरिक स्वरूप लक्षात घेऊन स्त्रीपुरुष समानतेचा आग्रही दृष्टिकोन न बाळगतादेखील स्त्रीला व्यापक कार्यक्षेत्रात काम करताना ज्या प्रकारचे शिक्षण आवश्यक आहे असे त्यांना वाटत होते त्याचा अंगीकार त्यांनी केला. स्त्रिया शिकल्या म्हणजे त्या समाजात विविध क्षेत्रांत महत्त्वाच्या जबाबदाऱ्या पार पाडू शकतात आणि सन्मानपूर्वक जगू शकतात याचा पडताळा त्यांना स्वत:च्या विद्यापीठातील विद्यार्थिनींच्या प्रगतीवरून आला होता. प्रपंच हा स्त्रीला अटळ आहे, अशी जाणीव त्यांनी स्त्रियांच्या शिक्षणक्रमात गाभ्याच्या ठिकाणी ठेवली होती. त्यामुळे केवळ मुंबई विद्यापीठाचा अभ्यासक्रम स्वीकारण्यापेक्षा त्यांनी स्वतंत्र अभ्यासक्रमाची आखणी करण्यावर भर दिला. स्त्रियांच्या शिक्षणाच्या कामासाठीदेखील स्त्रिया स्वयंस्फूर्तीने व बहुसंख्येने पुढे येत नाहीत, पुरुषांनाच झटून काम करावे लागते, हा जो त्यांचा दीर्घकालीन अनुभव होता त्यात काळानुरूप हळूहळू बदल होत गेला. स्त्रियांच्या प्रतिभेचे व प्रज्ञेचे तेज आणि त्यांची कर्तबगारी फैलावत चालली. स्त्रीवादी विचाराची चळवळ निर्माण झाली व आज काही प्रमाणात स्त्री अधिकाधिक स्वतंत्र होत चाललेली आढळते. या सर्व परिवर्तनाचे बरेचसे श्रेय कर्वे यांच्या पायाभूत व प्रेरक कार्याला दिले पाहिजे.

कर्व्यांना एके काळी ज्या समस्यांना तोंड द्यावे लागले व ज्या समस्यांचे निराकरण व्हावे म्हणून धडपडावे लागले ती समाजस्थिती आज राहिली नाही. स्त्रीशिक्षणाच्या बाबतीत व एकंदर स्त्रीविषयक प्रश्नांच्या बाबतीत कर्व्यांचा काळ आणि आजचा काळ यात महदंतर आहे. हे महदंतर उत्पन्न होण्यास ज्या ज्या लोकांनी प्रयत्न केले त्यांत महर्षी कर्वे यांचा क्रमांक पहिला आहे. आज समाजात स्त्रियांसंबंधीचे वेगवेगळे प्रश्न उपस्थित होत आहेत. त्या प्रश्नांची सोडवणूक करण्याचे मार्ग शोधत असताना कर्व्यांच्या जीवनपद्धतीचे व कार्यपद्धतीचे स्मरण नि:संशय उपयुक्त ठरू शकेल. इच्छाशक्तीच्या बळावर माणूस केवढे प्रचंड कार्य करू शकतो याचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे कर्वे यांचे जीवनचरित्र होय. हे जीवनचरित्र हा गेल्या दोन शतकांतील महाराष्ट्राच्या समाजेतिहासातील एक मोलाचा व तेजस्वी अध्याय आहे याकडे आपण दुर्लक्ष करून चालणार नाही.

●

**डॉ. विलास खोले**
दूरध्वनी : ०२०-२५२३ ४६४२



## प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प

सुजाता शेणई











# "मुलांचं भावविश्व लेखकांनी



वाचक आणि प्रकाशक यांचं नातं अतूट असतं. वाचनसंस्कृती वाढवण्याची आणि ग्रंथप्रसाराची मोठी जबाबदारी साहित्य व्यवहारातल्या या दोन महत्त्वाच्या घटकांवर अवलंबून असते. अनेक प्रकाशक चांगल्या व गांभीर्याने वाचन करणाऱ्या वाचकांसाठी अनेक प्रकल्प हाती घेऊन साहित्याचं दालन समृद्ध करत असतात. अशाच काही मराठी प्रकाशन संस्थांचा आणि त्यांच्या विविध प्रकल्पांचा परिचय 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरातून देत आहोत. या अंकात 'ज्योत्स्ना प्रकाशना'च्या प्रवासाविषयी, भूमिकेविषयी तसेच त्यांच्या विविध प्रकल्पांविषयी मिलिंद परांजपे यांच्याशी साधलेला संवाद.





गेल्या ६०-६५ वर्षांपासून 'बालसाहित्य' आणि 'चित्रकला' या दोन क्षेत्रांत स्वत:च्या प्रकाशनाचा ठसा उमटविणारी प्रकाशन संस्था म्हणून ज्या संस्थेचा उल्लेख लक्षणीय ठरतो ती म्हणजे ज्योत्स्ना प्रकाशन! १९५० साली सुरू झालेली, मुंबई व पुणे या दोन ठिकाणी कार्यालयं असलेली, दिल्ली व बेंगळुरू इथे भक्कम वितरण व्यवस्था उभी केलेली ही संस्था बालसाहित्याचं वेगळेपण सुरुवातीपासून जपत आली आहे. काळानुसार त्यात बदल करणं आवश्यक; नव्हे, अनिवार्य आहे. अन्यथा, प्रचलित साहित्य टिकणंही अवघड आहे, याची जाण ठेवून सतत कार्यरत असणारे या प्रकाशन संस्थेचे संचालक विकास आणि मिलिंद परांजपे. पुण्याच्या शनिवार पेठेत असलेल्या कार्यालयामध्ये मिलिंद परांजपे यांची भेट घेतली आणि मुक्त संवादाला सुरुवात झाली.

**● ज्योत्स्ना प्रकाशनची सुरुवात आणि आतापर्यंतच्या प्रवासाबद्दल काय सांगाल?**

-लक्ष्मण गोपाळ परांजपे, ज्यांना ल. गो. परांजपे म्हणून ओळखलं जायचं, त्यांनी १९५० मध्ये ज्योत्स्ना प्रकाशनाची सुरुवात केली. सुरुवातीला बालसाहित्य आणि धार्मिक पुस्तकं काढली जात होती. नंतर धार्मिक पुस्तकं पूर्णत: बंद केली. ल. गो. परांजपे यांनी ज्योत्स्ना प्रकाशनची ओळख म्हणजे 'मोठ्या टाइपातलं प्रकाशन' अशी बनवली. त्या वेळी मोठा फॉन्ट नव्हता. ल. गो. परांजपे यांनी प्रेसमध्ये मुद्दाम तो (२८ ते ३२ फॉन्ट) तयार करवून घेतला; ज्यामुळे वेगळेपण तर आलंच, पण तो मुलांना वाचायला सोपा जाऊ लागला. आजही 'चिमुकली इसापनीती', 'जंगलची राणी', 'माकडा माकडा हुप', 'सुसरबाई तुझी पाठ मऊ' अशी मोठा टाइप असलेली पुस्तकं बाजारात आहेत.

लहान मुलांच्या गोष्टींची आणि गाण्यांची पुस्तकं त्यांनी मोठ्या










# 'समजून घेणं आवश्यक'' मिलिंद परांजपे

फॉन्टमध्ये काढली. जादूची पुस्तकं, चित्रकलेची पुस्तकं काढून काही वेगळे प्रयोग करता येतील का, असा विचार करून सुरुवात केली. आधी मुंबईला झालेली सुरुवात १९८९ पासून पुण्यातही विस्तारली. या प्रकाशन संस्थेने 'मुलांच्या पुस्तकांना पर्याय नाही' असं दर्जेदार काढायचं ठरवलं आणि आजपर्यंत ते टिकविण्याचा प्रयत्न केलाय.

. जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने भरलेलं पुस्तक प्रदर्शन आणि २००६ मध्ये फ्रँकफर्टमध्ये भरलेलं पुस्तक प्रदर्शन पाहून बालसाहित्यातील पुस्तकांच्या आमच्या कल्पना बदलल्या. ते पाहिल्यावर वाटलं, की मुलांच्या पुस्तकांच्या बाबतीत आपण अगदी नगण्य आहोत. बाहेरचं काही पाहिलेलं आणि वाचलेलं नसल्यामुळे आपल्या मर्यादा खूप आहेत. साने गुरुजींच्या साहित्याचा आदर ठेवूनही म्हणावंसं वाटतं, की ते भावुकतेत अडकलेलं साहित्य आहे. आजच्या काळातील मुलांना जर आपण पुन्हा तेच द्यायला लागलो तर कसं चालेल? साने गुरुजींनंतर कोणता साहित्यिक दाखवता येतोय? मराठी साहित्यात 'रीटोल्ड' हा शब्द प्रस्थापित होऊ दिला नाही. या प्रदर्शनात इराण, बेल्जियम, कॅनडा इ. अनेक देशांतील बालवाङ्मय पाहायला मिळालं आणि विचारात बदल व्हायला सुरुवात झाली. 'हॅनाची सुटकेस' हे त्याचंच फलित म्हणावं लागेल.

● **बालसाहित्य आणि चित्रकला या विषयांवर आधारित आपण बरीच पुस्तकं केली आहेत. ही क्षेत्रं केंद्रित करण्यामागे आपला**









हेतू काय होता?

. - या दोन्ही क्षेत्रांतून मुलांचं भावविश्व चांगल्या पद्धतीने मांडता येतं आणि पकडताही येतं. मुलांच्या प्रतिभेला यातून वाव मिळतो आणि ती 'कॉपी कॅट' होणार नाहीत म्हणून प्रयत्नही करता येतो. १९८७-८८ चा काळ असेल. पुंडलिक वझे या चित्रकाराबरोबर चित्रकलेची बरीच पुस्तकं पाहण्याचा योग आला, त्यातून चित्रकलेची समज बरीच वाढली. मग वझे यांची 'चित्रे काढा प्राण्यांची', 'चित्रे काढा पक्ष्यांची', 'चित्रे काढा वाहनांची' ही पुस्तकं तयारं केली. प्रताप मुळीक, मिलिंद मुळीक यांच्या चांगल्या आणि वेगळ्या चित्रांना फोटोग्राफी व तंत्रज्ञानाची जोड दिली. फोटोग्राफी आणि तंत्रज्ञान दोन्हीही ज्योत्स्ना प्रकाशनाने विकसित केल्याने किंमत कमी ठेवता आली आणि गुणवत्ताही टिकवता आली म्हणून कौतुकही झालं. 'स्केचिंग', 'वॉटरकलर', 'ओपेक कलर', 'वॉटरकलर लॅन्ड' ही आर्ट स्कूलसाठी उपयुक्त पुस्तकं तयार केली. ती मराठीत आणि इंग्रजीतही उपलब्ध करून दिली. चित्रकलेच्या पुस्तकांच्या बाबतीत असं होतं की चित्रकार लेखन कमी करतात. चित्रकारांच्या शब्दांतून विचार यायला पाहिजेत. इथे लिखाणात आपण कमी पडतोय. चित्र समजण्यासाठी शब्दांचीच गरज असते.

**● बालसाहित्यात लेखक आणि चित्रकार दोन्ही महत्त्वाचे असतात, यासंबंधी आपली मतं काय आहेत?**

- आपण पुस्तकांवर नावं पाहतो ती लेखकांची असतात; पण बालसाहित्याची पुस्तकं ही लेखक, चित्रकार आणि मांडणीकार या तिघांची असतात. या तिघांनाही त्या पुस्तकांत एकत्रितपणे गणलं गेलं पाहिजे. आपल्याकडे चित्रकाराची दखल घेतली जात नाही म्हणून चित्रकार पुढे येत नाही. विंदा करंदीकर, मंगेश पाडगावकर यांच्या बालकवितेत चित्रकाराला महत्त्व नाही का? लेखक जेव्हा बालसाहित्याची निर्मिती करतो तेव्हा ते साहित्य मोठेसुद्धा वाचत असतात. मोठ्या माणसांमध्ये लहान मूल दडलेलं असतं. ते मूल त्या वाचनातून बाहेर येऊ पाहतं. बालसाहित्याची निर्मिती अशी झाली पाहिजे की ते साहित्य लहानांना आणि मोठ्यांनाही आपलं वाटलं पाहिजे. केवळ एखादी परीकथा आणून हे होणार नाही. माधुरी पुरंदरे यांच्या 'आमची शाळा', 'राधाचं घरं', 'बाबाच्या मिश्या' यांसारख्या पुस्तकांतून येणारी पात्रं खोटी नसतात. ती खरी तुमच्या-आमच्यातली असल्यामुळे चांगली रंगवता येतात. ती रंगवता आली की त्यांच्याशी सगळेच समरस होतात. चित्रकार हा लेखक आणि मुलं यांच्यातला पहिला मध्यस्थ असतो. या मध्यस्थाला त्याचा मान दिला पाहिजे. मुलांना चित्रं वाचायला, वाचलेली चित्रं स्वत:च्या शब्दांत मांडायला, त्यातून नवीन गोष्ट तयार करायला अशा चित्रसाहित्याची खूप मदत होते. म्हणूनच बालसाहित्य आणि चित्रकला ही मला सर्जनशीलतेची क्षेत्रं वाटतात.

**● माधुरी पुरंदरे यांच्या पुस्तकांचा मुलांच्या अध्ययन-क्षमतेसाठी कसा उपयोग होतो?**

- मुलांसाठी लिहिताना प्रचंड विचार करावा लागतो. बालसाहित्याची निर्मिती करणं अवघड असूनही आपल्याकडे बालसाहित्याला प्रतिष्ठा नाही. माधुरी पुरंदरे यांनी 'वाचू आनंदे' आणि 'लिहावे नेटके' हे वेगळे प्रयोग केले. 'लिहावे नेटके'चे तीन भाग आता तयार झाले आहेत. पारंपरिक व्याकरण रचना यात नाही. 'नियम नंतर, आशय आधी' अशी मांडणी केल्याने व्याकरणात येणारी नीरसता यातून दूर होते. याचा अध्ययनावर परिणाम असा होतो- की वाचन सुधारतं, वाचनाचा वेग वाढतो, आकलन क्षमतेचा विकास होतो. त्यांच्या शालेय अभ्यासासाठी या साध्य कौशल्यांमुळे खूप फायदा होतो. विचार करण्याची सवय लागते. चित्रामागे अर्थ असतो, ही दृष्टी त्यांना प्राप्त झालेली असते. त्यामुळे माधुरी पुरंदरे यांच्या पुस्तकांना चांगला प्रतिसाद मिळत आहे.

**● विज्ञान आणि क्राफ्ट या विषयांवरील पुस्तकांत आपण कोणतं वेगळेपण ठेवू इच्छिता?**

- माधव खरे यांची विज्ञानविषयक पुस्तकं आम्ही काढली. माधव खरे हे काही प्रचलित लेखक नाहीत, पण तरीही त्यांच्या 'विमाने उडवा', 'विमान कसे उडते' या पुस्तकांना अप्रतिम प्रतिसाद मिळाला. विज्ञानविषयक पुस्तकं काढताना मुलांना विमान उडवणं, तयार करणं हा खेळण्याचा भाग वाटला पाहिजे. खेळता खेळता त्यांची उत्सुकता वाढली की ते नकळत विज्ञानात शिरतात. भूमितीच्या सूत्रांशी ते कसे बांधले जातात हे त्यांचं त्यांनाही कळत नाही. मेधा सुदुंबरेकर यांची 'आर्ट अँण्ड क्राफ्ट - भाग १ आणि भाग २' अशी पुस्तकं आहेत. क्राफ्टमध्ये सर्जनशीलता दडलेली असते. काही गोष्टी मुलांना करायला सांगण्याबरोबरच न सांगितलेल्या गोष्टी त्यांना सुचणं आणि त्या मुलांनी करणं यांचं वेगळेपण ठेवण्याचा प्रयत्न करतो. मी आधी म्हटल्याप्रमाणे ती फक्त 'कॉपी कॅट' नकोत, तर स्वत:च्या बुद्धीची भर घालून त्यांनी काही तरी केलं पाहिजे.

**● ज्योत्स्ना प्रकाशनाच्या प्रकल्पांबद्दल काय सांगाल?**

- सतत नवनवीन शोधणं आणि करत राहणं ही काळाची गरज आहे तशी प्रकाशन संस्थांचीही आहे. माधुरी पुरंदरे, माधव खरे यांच्या पुस्तकांचे प्रकल्प तर आहेतच; पण नीलिमकुमार खैरे यांनी 'साप' या प्राण्याबद्दलची मुलांसाठी लिहिलेली माहिती आणि त्यावर आधारित पुस्तकं, हे प्रकल्प म्हणता येतील. अरविंद गुप्ता यांची मुलांसाठी विज्ञानाची दर्जेदार पुस्तकं (उदा. कचऱ्यातून करिष्मा, सोपी विज्ञानखेळणी इ.) ज्या मोठ्या कादंबऱ्या आहेत त्यांचं वाचन मुलांकडून होणं अवघड आहे; परंतु त्या मुलांपर्यंत

पोचवायच्या आहेत. यासाठी आम्ही काही चांगल्या कादंबऱ्या निवडल्या आहेत, निवडतो आहोत. त्याचं मुलांसाठी 'व्हर्जन' करायचं आहे; पण त्यासाठी माणसं मिळत नाहीत. तरीही आम्ही प्रयत्नशील आहोत. आमच्या वेबसाइटवर आमची पुस्तकं तर दिसतीलच, परंतु इतर प्रकाशकांची मुलांसाठी उपयुक्त असलेली पुस्तकंही आम्ही उपलब्ध करून देण्याचा विचार करत आहोत. मुलांसाठी एखादा 'ब्लॉग' लिहिण्याचाही विचार आहे, ज्यातून साहित्याची चर्चा घडेल व चांगलं साहित्य मुलांपर्यंत पोचेल.

**● वाचक-प्रकाशक संबंध अणि नवीन तंत्रज्ञानाचा बालसाहित्यात वापर याविषयी काय सांगाल?**

- वाचकांचा प्रतिसाद, काही ठराविक पुस्तकं सोडली तर, कमी मिळतो. प्रसारमाध्यमं आम्हाला अपेक्षित साथ देत नाहीत. शिक्षक, पालक, दुकानदार यांचा दृष्टिकोनच वेगळा असतो. दुकानदार तर ज्या प्रकाशनाकडून अधिक सवलत मिळते ते पुस्तक गिऱ्हाइकाच्या पुढे ठेवतो. बालकुमार साहित्य संमेलन म्हणजे शाळेतल्या मुलांना आणून बसवणं, असा प्रकार असतो. बालसाहित्याचे वाचक जर मुलं असतील तर विविध संस्थांनी त्यासाठी पुढाकार घेतला पाहिजे. बालकुमार साहित्य संमेलनात चित्रकार आणि मुलं यांचा थेट संवाद घडला पाहिजे.

तंत्रज्ञानामध्ये वाढीव क्षमता आहेत. त्याचं सामर्थ्य लक्षात घेतलं पाहिजे. पुस्तकांचं 'डिजिटलायझेशन' होणं गरजेचं आहे. उदा. विज्ञानात लंबक कसा हलतो हे प्रात्यक्षिकासह संगणकावर दिसलं तर त्याचा परिणाम निश्चितच जास्त होतो. विज्ञानाची सप्रयोग पुस्तकं एका क्लिकवर दिसली तर विद्यार्थी का वळणार नाहीत वाचनाकडे? आपण आहे ते साहित्य, मजकूर किंवा माहिती तंत्रज्ञानात कोंबत आहोत; त्याऐवजी तंत्रज्ञानाची गरज ओळखून, सामर्थ्य लक्षात घेऊन मजकूर तयार झाला पाहिजे.

**● चित्रकारांच्या प्रात्यक्षिकांचे व्हिडिओ पाहण्यासाठी आमच्या वेबसाइटला भेट द्या, असं म्हणण्यामागचा हेतू काय?**

- चित्रांच्या संदर्भात ज्या संज्ञा वापरल्या जातात त्याचं स्पष्टीकरण वाचताना प्रत्येक वेळी होईलच असं नाही. कलेच्या संदर्भात प्रात्यक्षिक खूप महत्त्वाचं असतं. उदा. चित्रात रंग भरताना रंग कसा तयार करायचा, ब्रश किती नंबरचा वापरायचा, तो कसा धरायचा, रंगात पाणी किती घालायचं इ. अनेक भाग येतात. आमच्या वेबसाइटवर मिलिंद मुळीक प्रत्यक्ष चित्र काढताना, रंग भरताना दिसतात. त्याच वेळी स्पष्टीकरणही मिळतं. 'राघाचं घर' या गोष्टीचं श्राव्य आणि दृश्यरूप पाहायला मिळतं. वेबसाइटमुळे अनेकांशी संपर्क साधला जातो, म्हणून वेबसाइटही अद्ययावत असणं गरजेचं आहे. तंत्रज्ञानाशिवाय पुढील काळात टिकून राहणं अवघड होईल.


**मिलिंद परांजपे**
ज्योत्स्ना प्रकाशन
चलभाष : ९८२२२८६२८६
milind@jyotsnaprakashan.com
www.jyotsnaprakashan.com




**● बालसाहित्यातील अनुवादा-विषयी काय सांगाल?**

- बालसाहित्याच्या निर्मितीसाठी आणि अनुवादासाठी बाहेरची पुस्तकं पाहिली पाहिजेत, वाचली पाहिजेत. 'हॅरी पॉटर' जर मराठीत पोचला तर मराठीतली पुस्तकंही अन्य भाषांत पोचली पाहिजेत. अगदीच काही पोचली नाहीत असं नाही, पण अजून चांगले अनुवादक उपलब्ध होत नाहीत. 'हॅनाची सुटकेस', ज्याला मी परिपूर्ण पुस्तक असं म्हणतो, ते पुस्तक चाळीस देशांत पोचलं आहे. आता या पुस्तकावर चित्रपट येऊ पाहत आहे. 'हॅनाची सुटकेस' या पुस्तकाचं वैशिष्ट्य म्हणजे कोणत्याही वयोगटासाठी याची निर्मिती झाल्यासारखी वाटते. प्रत्येक वयाला त्यातून नवे नवे अर्थ प्रत्येक वाचनात गवसतात. अशा पुस्तकांची निर्मिती, अनुवाद झाले पाहिजेत.

**● मराठीतील बालसाहित्याची सद्य:स्थिती कशी आहे?**

- बालसाहित्याची परिस्थिती फारशी समाधानकारक नाही. यामध्ये मी मुलांना अजिबात दोष देणार नाही. हा दोष लेखक, चित्रकार आणि प्रकाशक यांचा आहे. एकविसाव्या शतकातील तंत्रज्ञानाला सहज हाताळू पाहणारी मुलं कोणत्या भावविश्वात रमतात हे लेखकांनी समजून घ्यायला हवं. त्यांच्या आजूबाजूला असलेलं वातावरण त्यांच्यावर काय परिणाम करत आहे हे शोधल्याशिवाय निर्मिती करणं म्हणजे चुकीचा रस्ता शोधण्यासारखं आहे. आता बालसाहित्यात वेगळे प्रयोग झाले पाहिजेत. मुलांची भाषा समजून घेऊन निर्मिती झाली तर बालसाहित्य टिकेल; अन्यथा इतर माध्यमांकडे मुलांचा ओढा वाढतोच आहे.

●


**प्रा. सुजाता शेणई**
चलभाष : ९०११०१७९१६
sujata.shenai@gmail.com












लेख
स्वाती कर्वे



# आठवणीतील पुस्तके निवड आणि वाचन करताना



■■
डॉ. स्वाती कर्वे यांचे 'आठवणीतील पुस्तके' हे पुस्तक लवकरच उत्कर्ष प्रकाशनातर्फे प्रकाशित होत आहे. मराठी साहित्यात मौलिक योगदान दिलेल्या पंचवीस साहित्यकृतींवर आस्वादपर लेख त्यांनी पुस्तकात लिहिले आहेत. या पुस्तकाची निर्मितीप्रक्रिया उलगडणारा खुद्द लेखिका-आस्वादक डॉ. स्वाती कर्वे यांचा हा लेख.
■■

'आठवणीतील पुस्तके' या पुस्तकाच्या लेखनाकडे मी काहीशा अनपेक्षितपणे, योगायोगानेच वळले. मनाला आनंद देणारे, वेगळेच लेखन करण्याचा योगच जुळून आला असे आज वाटते. एखाद्या कलावंताच्या मनाला एखादा विषय सहजगत्या भिडावा, मनात विषयाने घर करावे, त्यातून निर्मितीची प्रक्रिया सुरू व्हावी, असेच काहीसे 'आठवणीतील पुस्तके'च्या संदर्भात घडले.

२०११ मध्ये 'विनोद विद्यापीठ' या संस्थेचे संचालक बाबुराव कानडे यांनी मला १३ जूनला आचार्य अत्रे यांच्या पुण्यतिथीनिमित्ताने आयोजित केलेल्या कार्यक्रमात 'मी कसा झालो' या पुस्तकावर बोलण्यासाठी बोलावले होते. १९९८ मध्ये आचार्य अत्रे यांच्या जन्मशताब्दीवर्षी बाबुराव कानडे यांच्याच संस्थेत 'मी कसा झालो' या पुस्तकावर बोलले होते. त्यानंतर बारा-तेरा वर्षांनी मी पुन्हा 'मी कसा झालो'चे वाचन करीत होते. वाचताना मी एका विलक्षण अनुभवातून जात होते. पुस्तक जणू मला नव्याने समजत होते. माझेच पूर्वीचे आकलन नवीन जाणिवेने उजळून निघत असल्याचा प्रत्यय मला आला. आचार्य अत्रे तर पुन्हा एकदा मला समजलेच, परंतु त्याहीपेक्षा पुस्तकाच्या किती तरी नवीन बाजू माझ्या लक्षात येत होत्या. १९११- म्हणजे बरोबर शंभर वर्षांपूर्वी अत्रे सासवडहून पुण्याला आले होते. शंभर वर्षांचे पडदे दूर झाले आणि मला शंभर वर्षांपूर्वीचे पुणे दिसू लागले. पुण्यातील वातावरण, रस्ते, शनिवारवाड्याचा परिसर, लो. टिळक आणि त्यांच्या 'केसरी'चा पुण्याच्या सांस्कृतिक वातावरणात असणारा दबदबा, पुण्यात होणारी नाटके, मूकपटाकडून बोलपटाकडे झालेला चित्रपटांचा प्रवास, बालकवी ठोंबरे, नाटककार गडकरी... इत्यादी इत्यादी. वाचताना लक्षात आले, की आचार्य अत्रे यांचे आत्मकथन एका महत्त्वाच्या काळातील महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचा इतिहासच आपल्यापुढे उलगडत आहे. कोणत्याही काळाला समजून घेण्यासाठी त्या काळातील वृत्तपत्रे, नियतकालिके ज्याप्रमाणे अभ्यासाचे महत्त्वाचे साधन ठरतात, त्याप्रमाणे विशिष्ट काळातील चरित्रे/आत्मचरित्रेसुद्धा

गतकाळाला समजून घेण्यास उपयोगी पडतात. काळाची सांस्कृतिक स्थितिगती चरित्र/आत्मचरित्रातून व्यक्त होत असते. व्यक्ती-समाज-संस्कृती आणि साहित्य यांच्या अनुबंधाचे स्वरूपच त्यातून व्यक्त होते. काळाच्या पडद्यावरच आचार्य अत्रे यांची जडणघडण समजून येत होती. काळ माणसाला घडवतो तसेच माणसाकडूनही काळ कसा घडवला जातो या आदानप्रदान प्रक्रियेचे प्रत्यक्ष रूपच 'मी कसा झालो'मधून स्पष्ट होताना दिसले.

मला आठवले- एकदा बोलताना कै. डॉ. सरोजिनी वैद्य म्हणाल्या होत्या, ''व्यक्ती असो की घटना, की कलाकृती, काळाच्या चौकटीतच त्यांना जाणून, तपासून घ्यावे लागते.'' 'मी कसा झालो' वाचताना सरोजिनीबाईंचे बोलणे आठवत होते.

साहित्यकृतीमध्ये 'काळ' हा महत्वाचा घटक असल्याने कलाकृती काळाच्या संवेदनाच व्यक्त करीत असते. काळ पुढे जातो तसा एकंदर जीवनाचा कायापालट होत असतो. तेव्हा काळाच्या विवक्षित टप्प्यावरून मागे वळून बघताना गतकाळातील कलाकृतीचे महत्त्व व आवाहनक्षमता नवीन काळाच्या संदर्भात नवीन असते. गतकाळाचे जीवन, ताण, प्रश्न, वातावरण सारे सारे कलाकृतीतून नव्याने जाणून घेता येते.



'मी कसा झालो'च्या पुनर्वाचनाने माझ्या विचारांना चालना दिली. नवीन आकलनाच्या परिप्रेक्ष्यातूनच मी १३ जून २०११च्या कार्यक्रमात बोलले. कार्यक्रम झाला परंतु माझ्या मनातील विचार थांबले नाहीत. अनेक पुस्तकांचा मनात विचार येऊ लागला. त्याच वेळी ज्येष्ठ समीक्षक प्रा. रा. ग. जाधव यांनी 'साहित्य : बदलते परिप्रेक्ष' या त्यांच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत व्यक्त केलेला विचार मला प्रेरणा देणारा ठरला. प्रस्तावनेत प्रा. जाधव सरांनी म्हटले आहे- 'साहित्य क्षेत्रातील साहित्यिक आणि साहित्यकृती यांचा पुन्हा पुन्हा विचार करणे केवळ क्रमप्राप्त असते असेच नव्हे, तर या प्रकारचा पुनर्विचार ही खरे तर प्रगतिशील साहित्य व्यवहाराची गरजही असते.' (साहित्य : बदलते परिप्रेक्ष : प्रा. रा. ग. जाधव, पद्मगंधा प्रकाशन : पृ. ८)

माझ्या मनातील विचारांना आता कोंब फुटू लागले. हा एका लेखमालेचा विषय आहे. मराठीतील निवडक पुस्तकांवर 'आठवणीतील पुस्तके' अशी लेखमालाच लिहावी असे माझ्या मनाने ठरवले. त्याच सुमारास 'विपुलश्री' मासिकाच्या संपादक माधुरी वैद्य यांना मी माझ्या मनातील लेखमालेची कल्पना सांगितली. माधुरी वैद्य यांना विषय खूपच आवडला. ''तुम्ही पुस्तकांची यादी करा. जानेवारीपासून २०१२ व २०१३ अशी दोन वर्षांसाठी लेखमाला होईल.'' माधुरी वैद्य यांच्या उत्स्फूर्त प्रतिसादाने माझ्या मनातील कल्पना लगेच प्रत्यक्षात आली.

'आठवणीतील पुस्तके' असे लेखमालेचे शीर्षक निश्चित करून मी लेखनाच्या दृष्टीने शिस्तबद्ध विचार करू लागले. एकोणिसाच्या शतकाची अखेर ते साधारण १९९० पर्यंतची एकोणीस पुस्तके निवडायची होती. एक किंवा दोन वाङ्मयप्रकारांतील किंवा फक्त ललित स्वरूपाची पुस्तके मला निवडायची नव्हती. कादंबरी, कथा, आत्मचरित्र, प्रवासवर्णन, नाटक, वैचारिक अशी वेगवेगळ्या प्रकारची, वाङ्मयीन दृष्टीने वेगवेगळ्या टप्प्यांवरची पुस्तके निवडायचे मी ठरवले. 'आठवणीतील पुस्तके' एका प्रकारची थोडीच असतात?

'पण लक्षात कोण घेतो', 'कीचकवध', 'कळ्यांचे निःश्वास', 'रणांगण', 'मी कसा झालो', 'शांतता कोर्ट चालू आहे', 'बलुतं' अशी काही पुस्तकांची नावे पहिल्या विचारातच निश्चित झाली. काही वेगळ्या स्वरूपाच्या पुस्तकांची निवड मी जाणीवपूर्वक केली. कवी अनिल आणि ज्येष्ठ कथाकार, समीक्षक कुसुमावती देशपांडे यांचा विवाहपूर्व काळातील पत्रव्यवहाराचा संग्रह 'कुसुमानिल' मराठी साहित्याचा ठेवा आहे. आज 'कुसुमानिल' या पत्रसंग्रहाचे महत्त्व वैयक्तिक संदर्भांना ओलांडून जाणारे आहे. सामाजिक, सांस्कृतिक स्थितिगतीच्या एका टप्प्यावरील एका पिढीचे ते अनुभव आहेत. काळाबरोबर पुढे येणारी नवविचारांची पिढी आणि परंपरागत विचारांच्या पिढीचे विचार, लग्नाविषयीच्या कल्पना, वैचारिक संघर्ष आणि १९२०-१९२५ च्या काळातील वातावरणही या पत्रसंग्रहातून आविष्कृत होते. त्या दृष्टीने मी 'कुसुमानिल'चा वेध घेण्याचे ठरवले.

जयवंत दळवी यांचे 'सारे प्रवासी घडीचे' प्रथम निवडले.

परंतु पुन्हा मनात आले, दळवींच्या 'ठणठणपाळ'ला तोड नाही. 'गमतीसाठी गमतीने आणि गमतीदार' टिपणे म्हणून जयवंत दळवी यांनी वीस वर्षे 'ललित' मासिकातून केलेल्या लेखनातून वाङ्मयीन पत्रकारिता आणि निर्विष टीकेचा आदर्श नमुनाच सिद्ध केला. साठोत्तरी वाङ्मयीन वातावरणाचा दस्तऐवज म्हणून आज 'ठणठणपाळ' आणि 'आणखी ठणठणपाळ' या दोन्ही पुस्तकांचा एकत्र विचार करावा, असा मनानेच कौल दिला.

पु. ल. देशपांडे यांची प्रवासवर्णने मुळातच मला जास्त आवडतात. त्यातही 'वंगचित्रे' जास्त जवळचे वाटते. पु. ल. १९७० मध्ये बंगाली शिकण्यासाठी शांतिनिकेतनमध्येच जाऊन राहिले होते. अतिरेकी, दहशतवादी हे शब्द आपल्याला अपरिचित असण्याचा तो काळ होता. परंतु बंगालमध्ये नक्षलवादी चळवळ जोर धरीत होती. बंगालमधील लोकजीवनावर त्याची सावली पडत होतीच. साहजिकच पु.लं.च्या अनुभवविश्वावरही ती सावली पडलेली दिसते. 'वंगचित्रे'चा शेवटचा भाग तर नक्षलवादी चळवळींनी 'शांतिनिकेतन'चे नंदनवनही कसे उद्ध्वस्त केले याचेच प्रत्ययकारी वर्णन करणारा आहे. 'वंगचित्रे'ला असणारा हा 'काळा'चा संदर्भ महत्त्वाचा वाटल्यानेच मी 'वंगचित्रे'ची निवड केली.

२०१३ मध्ये 'कोसला'ला पन्नास वर्षे पूर्ण होत होती. आज मागे वळून बघता 'कोसला' वाङ्मयीन घटना वाटते. १९६०-६५च्या आसपास ग्रामीण जीवनातील तरुण एका मानसिक अवस्थेत होता. चाकोरीबद्ध, पितृकेंद्री खेड्यातील वातावरणात त्याची कोंडी होत होती. शहरात जाऊन व्यक्तिमत्त्व कमवावे असेही वाटत होते, परंतु महानगरीय जीवनात हरवून जाण्याची धास्ती होती. स्वतःच्या कल्पना आणि सतत विरोधात असणाऱ्या बाह्य परिस्थितीच्या ताण्याबाण्यात गुदमरून जाणाऱ्या हळव्या मनोवृत्तीच्या तरुणाच्या मानसिक कोलाहलाची, संघर्षाची, व्यस्ततेची कहाणीच नेमाडे यांनी 'कोसला'त नव्या भाषेत, नव्या प्रतीकात्मतेत कशी उभी केली आहे. काळाच्या पडद्यावरच 'कोसला' उलगडून दाखवता येईल, या विचाराने 'कोसला'ची निवड करण्याचे मनात सुरुवातीपासून होतेच. तसेच ह. मो. मराठे यांच्या 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी' या लघुकादंबरीमध्ये महानगरीय संवेदनेबरोबरच तत्कालीन तरुण पिढीचा जीवनसंघर्ष, जीवनाच्या व्यस्ततेचे त्यांना आलेले भान कसे व्यक्त होते, या दिशेने कलाकृतीचा वेध घेण्याचे मी ठरवले.

२०१२-२०१३ चा काळ म्हणजे दुसऱ्या महायुद्धाला सत्तर वर्षे पूर्ण होण्याचा काळ. वि. ग. कानिटकर यांचा ग्रंथ 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' दुसऱ्या महायुद्धाचे संपूर्ण महाभारतच वाचकांना सांगतो. हिटलरसह स्वतःचा इतिहास तयार केलेल्या आणि दर वर्षी नव्या आवृत्तीसह वाचकांच्या आठवणीत सदैव राहणाऱ्या या अजोड पुस्तकाची निवड मी केली.

'मार्च महिन्यात एखादे स्त्रियांविषयी'चे पुस्तक घ्यावे, असे माधुरी वैद्य यांनी सुचवले. एक वर्ष 'कळ्यांचे निःश्वास' निवडले, तर २०१३ मार्चसाठी भारतीय सहजीवनाचा व्यापक पटावर वेध घेणाऱ्या गीता साने यांच्या 'भारतीय स्त्रीजीवन' या वैचारिक पुस्तकाची मी निवड केली.

पुस्तकाची निवड करताना काही ठिकाणी द्विधा मनःस्थिती व्हायची. रमाबाई रानडे यांचे आत्मकथन 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' घ्यावे की आनंदीबाई कर्वे यांचे 'माझे पुराण' घ्यावे? प्रश्न पडला. दोन्ही पुस्तके वाचली. नंतर विचार केला. २००७ मध्ये रमाबाई रानडे यांच्या आत्मकथनाला शंभर वर्षे झाली. त्या निमित्ताने पुस्तकाविषयी लिहिले, बोलले गेले होते. 'उंच माझा झोका' या मालिकेच्या रूपाने रमाबाई रानडे वाचकांसमोर येत होत्याच. तसेच कोकणातील बालविधवा, पं. रमाबाई यांच्या शारदा सदनातील पहिली विधवा विद्यार्थिनी, महर्षी अण्णासाहेब कर्वे यांच्याबरोबर विवाह केल्यानंतरचा आनंदीबाईंचा जीवनप्रवास, सारेच मोठे विलक्षण आणि महाराष्ट्रातील सुधारणावादाचे प्रत्यक्ष रूपच आहे. स्त्रीजीवनाच्या प्रवासातील आदिपर्वातील महत्त्वाचा टप्पा व्यक्त करणारे आत्मकथन 'माझे पुराण' मी निवडले. तसेच दुर्गाबाई भागवत यांचे 'पैस' घ्यावे की 'ऋतुचक्र'? प्रश्न पडला. दोन्ही पुस्तके दोन वेळा वाचली. शेवटी विचार केला, 'ऋतुचक्र'मध्ये दुर्गाबाईंच्या प्रतिभेचा, प्रज्ञेचा, निरीक्षण आणि अभिजात शैलीचाही वेगळा आविष्कार आहे. मराठी साहित्यात असे लेखन बहुधा दुसरे नाहीच. आणि 'ऋतुचक्र'ची निवड केली.

ऑगस्ट २०११ मध्ये मी लेखमालेच्या कामाला सुरुवात केली. कालानुक्रमे जायचे ठरविल्याने कामाची सुरुवातही 'पण लक्षात कोण घेतो', 'कीचकवध',... अशीच झाली. 'आठवणीतील पुस्तके'चे लेखन करताना माझी भूमिका मी विचारपूर्वक निश्चित केली. अभ्यासाचे, लेखनाचे मध्यवर्ती सूत्र ठरवले. मला तात्त्विक समीक्षा करायची नव्हती, तसेच फक्त पुस्तकाचा परिचय, परीक्षणही करायचे नव्हते. मराठी वाङ्मयाच्या इतिहासात आपल्या कलात्मक वैशिष्ट्यांनी स्वतःचे अस्तित्व सिद्ध केलेल्या कलाकृतींचे सौंदर्य, स्वरूप मला उलगडून दाखवायचे होते. लेखकाची भूमिका, पुस्तकाची अर्थपूर्णता, परिणामकारकता स्पष्ट करायची होती. पुस्तकातून व्यक्त होणारा सामाजिक आशय, लेखकाचा त्याविषयीचा दृष्टिकोन स्पष्ट करायचा होता. आज

एकविसाव्या शतकाचेही प्रथम दशक पूर्ण केल्यावर या सर्व पुस्तकांचे महत्त्व काय आहे, आवाहनक्षमता कशी टिकून आहे... अभिजात वाङ्मय म्हणूनही प्रत्येक पुस्तकाची मौलिकता मी विशद करण्याचे ठरवले.

वाङ्मयीन दृष्टीने पुस्तकांचा वेध घेणे मला पुरेसे वाटेना. आंतरशाखीय अभ्यासपद्धती आज विद्यमान असताना सामाजिक, सांस्कृतिक दृष्टीने, साहित्यातून समाजाकडे या दिशेने या कलाकृती समाजवास्तवाला कशा अभिव्यक्त करतात; व्यक्ती, साहित्य, समाज आणि संस्कृती यांचा अनुबंध कसा व्यक्त होतो, या दृष्टीनेही पुस्तकांचा वेध घेण्याचे मी ठरवले. म्हणूनच व्यंकटेश माडगूळकर यांची 'वावटळ' ही लघुकादंबरी म. गांधी वधानंतर उठलेल्या 'वावटळी'ला सामाजिक दृष्टीने कशी अभिव्यक्त करते हे उलगडून दाखवणे लेखक म्हणून मला माझे कर्तव्य वाटले. अर्थात आस्वादक समीक्षेच्या अंगानेच प्रत्येक पुस्तकाचे विवेचन करण्याचे मी ठरवले. प्रत्येक पुस्तकाच्या विषयाच्या, प्रकाराच्या व स्वरूपाच्या दृष्टीने विवेचनात काहीसा फरक होत होता. तसा तो होणेही स्वाभाविक होते. महत्त्वाचे म्हणजे माधुरी वैद्य यांनी मला भरपूर जागा दिली. मासिकाची पाच-सहा पाने मिळाली. त्यामुळेच मनासारखे, मनाजोगते, मोकेळेपणाने लेखन करता आले. जानेवारी २०१२ पासून ऑक्टोबर २०१३ पर्यंत 'विपुलश्री' मासिकातून 'आठवणीतील पुस्तके' ही १९ लेखांची लेखमाला प्रसिद्ध झाली.

लेखमालेचे पुस्तक करण्याचा विचार होताच. लेखमाला प्रसिद्ध होत असतानाच उत्कर्ष प्रकाशनचे सुधाकर जोशी यांनी पुस्तक प्रकाशित करण्याची इच्छा व्यक्त केली. पुस्तकाच्या दृष्टीने एकोणीस संख्या काहीशी विचित्र वाटत होती. आणखी सहा पुस्तकांवरील लेखांची भर घालायचे ठरवले. माझ्या मनात अन्य पुस्तकांची नावे घोळत होतीच. 'माझा प्रवास' हे गोडसे गुरुजींचे प्रवासवर्णन म्हणजे 'प्रवासवर्णन'पर लेखनाचा मेरुमणीच. या प्रवासवर्णनाला १८५७ च्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्व आहेच. परंतु त्याचबरोबर 'प्रवासवर्णन' लेखनाची, फॉर्मलेस फॉर्म असणाऱ्या ललित गद्याच्या एका प्रकाराची संकल्पना रुजवण्याच्या दृष्टीनेही 'माझा प्रवास'ला महत्त्व आहेच. 'माझा प्रवास'साठी फार विचार करावा लागला नाहीच. अन्य पुस्तकांचा विचार करण्यापूर्वीच लक्षात आले, की बा. सी. मर्ढेकर आणि गंगाधर गाडगीळ यांना ओलांडून आपल्याला पुढे जाता येत नाहीये. मौज प्रकाशनगृहाने मर्ढेकरांच्या निधनानंतर मर्ढेकरांच्या सर्व कविता 'मर्ढेकरांची कविता' या संग्रहात प्रसिद्ध केल्या. 'मर्ढेकरांची कविता' या संग्रहाच्या आधारे 'शिशिरागम', 'काही कविता', 'आणखी काही कविता' या क्रमानेच मर्ढेकरांच्या कवितांचे अंतरंग उलगडण्याचा मी प्रयत्न केला. तसेच गंगाधर गाडगीळ यांचा स्वतंत्र कथासंग्रह न घेता श्री. पु. भागवत यांनी १९५८ मध्ये संपादित केलेला 'गाडगीळांच्या कथा' या संग्रहाची निवड केली. गंगाधर गाडगीळ यांच्या नवकथांचे एकत्रित दर्शन या संग्रहातून कसे होते, या दिशेने मी या कथासंग्रहाचे स्वरूप स्पष्ट केले. या दोन्ही ज्येष्ठ लेखकांवर उदंड लेखन खरे पाहता झाले आहे. तरीही मला त्यांच्याविषयी अभ्यास करून लेखन करावेसे वाटले. अर्थात या दोन्ही 'सनदी शेतकऱ्यांना' (डॉ. विजया राजाध्यक्ष यांच्या मते) मला वळसा घालून जाता येत नव्हते हेच खरे. शांताबाई कांबळे यांचे आत्मकथन 'माज्या जल्माची चित्तरकथा' आणि बेबी कांबळे यांचे आत्मकथन 'जिणं आमुचं' या दोन्ही आत्मकथनांना आज 'पीरियड पीस'चे महत्त्व आहे. या दोन्ही आत्मकथनांचा मी एकत्र विचार करायचे ठरवले. गो. नी. दांडेकर यांची 'मास्टरपीस' कादंबरी 'पडघवली' आणि सतीश आळेकर यांचे महत्त्वाचे आणि खरोखरच 'आठवणीतील नाटक' 'महानिर्वाण' यांची निवड माझ्या मनाने आधीच केली होती.

'पण लक्षात कोण घेतो' ते 'दुस्तर हा घाट' अशी पंचवीस 'आठवणीतील पुस्तके' वाचकांच्या भेटीला येत आहेत. वाचकांचा लेखमालेला उत्तम प्रतिसाद मिळत होता. एक वाचक भगिनी म्हणाल्या, 'तुमचे लेख वाचून मूळ पुस्तक वाचायची ओढ लागते. मी प्रत्येक पुस्तक वाचते.' लेखमालेचा हेतूच पूर्ण होत असल्याची साक्ष मिळाली. ह. मो. मराठे फोन करून अनेकदा त्यांच्या प्रतिक्रिया कळवत. 'कोसला'वरचा लेख वाचून डॉ. भालचंद्र नेमाडे यांनी पत्रच पाठवले. वि. ग. कानिटकर यांनी 'नाझी भस्मासुराचा उदयास्त'वरील लेखाच्या संदर्भात मनापासून प्रतिसाद दिला. तेव्हा फक्त आनंदच झाला नाही, तर श्रम सार्थकी लागल्यासारखे वाटले. काम करायला नवा हुरूप आला.

दोन वर्षे कशी गेली समजलेच नाही. पुस्तकांचे वाचन, संबंधित अन्य पुस्तकांचे वाचन, संदर्भ शोधणे, टिपणे काढणे, प्रत्यक्ष लेखन यामध्ये मन बुडून गेले होते. अन्य काही कामे करतानाही मनात एखाद्या पुस्तकाचा विचारच तरंगत असायचा. कामाचा आनंद, समाधान आणि मनाची समृद्धी तर मोजमापाच्या पलीकडेच. आठवणीतील पुस्तकांची निवड, वाचन आणि लेखन हा एक अनोखा अनुभवच होता. वाचक, जाणकार पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा म्हणूनच वाटते.

●

**डॉ. स्वाती कर्वे**
चलभाष : ९८२२०८२२०१



मनोगत

ऐश्वर्य पाटेकर

■ समकालीन महत्त्वाचे कवी ऐश्वर्य पाटकर यांची 'जू' ही आत्मकथनात्मक कादंबरी 'सकाळ प्रकाशना'च्या वतीने नुकतीच प्रकाशित झाली आहे.
लेखकाने वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत परिस्थितीशी केलेल्या झगड्याची ही कहाणी आहे.
या आत्मकथनात्मक कादंबरीच्या निमित्ताने लेखकाने व्यक्त केलेले मनोगत.

# मी भावड्याचं आत्मकथन लिहिलंय...



आई नेहमी म्हणायची, ''लेका, उकिरड्याचीबी दैना फिटतेच; तशी आपलीबी दैना फिटंलच एक ना एक दिवस.'' खरोखरच ती वेळ आली होती की काय? एवढं मात्र झालं होतं, की कंदिलाच्या काचेची काजळी झटकून काच नितळ झाली होती. वाईट दिवस जाऊन चांगल्या दिवसांचा सुगावा लागला होता. मी विचार करू लागलो. वेळेचं अस्तर फाडत फाडत मागे जाऊन त्या दिवसांपाशी थांबलो, जिथे परिस्थितीने आईसकट आमच्या खांद्यावर एक 'जू' ठेवलं होतं. त्याचा भार जाणवत नव्हता असं नाही, पण तो सोसण्याशिवाय गत्यंतर नव्हतं. शाळेने आज माझ्या हातावर एक सर्टिफिकेट ठेवलं. तसं अनुभवांनीही त्यांचं एक सर्टिफिकेट ठेवलं. फरक इतकाच, की त्याच्यावर पास की नापास हा शेरा ठेवलेला नव्हता. आम्ही भावंडं जसे एक भाकर सर्वांत वाटून खायला शिकलो होतो, तसाच खांद्यावर लादलेल्या 'जू'चा भारही वाटून घ्यायला शिकलो होतो. कधी त्याचा भार माई खांद्यावर घ्यायची, कधी अक्का. कधी तायडी, कधी पमी. आई तर होतीच पुन्हा सारा भार पेलायला.

त्याचा भार आता मात्र जाणवू लागला होता.

ते एकटं एक का 'जू' होतं?

हजार 'जू' होते आमच्या खांद्यावर!
आजीनं अतोनात केलेल्या छळाचं 'जू'
बाप असूनही बिनबापाचं म्हणत हिणवणारं 'जू'
बापानं बळजबरीनं लादलेलं वनवासाचं 'जू'
चुलत्या-काक्यांनी केलेल्या कटकारस्थानाचं 'जू'
जगणं मुश्किल करून सोडणारं 'जू'
अवघड परिस्थितीच्या जुलुमाचं 'जू'
फाटक्या आयुष्याचं फडकं फाडायला बिलगलेलं गावाच्या नतद्रष्ट हातांचं 'जू'
आईच्या पाठीवर असलेल्या मजुरीचं 'जू'
मजुरीच्या मालकांनी घतलेल्या कष्टाचं 'जू'
माझ्या बहिणीचं बालपण हिरावून घेणारं 'जू'
घरानंही डोक्यावरचं छप्पर काढून भर पावसात उभं करण्याचं 'जू' ..
लाख अपमानाच्या प्रसगांचं 'जू'
पाठीपोटावरच्या माराचं 'जू'
भुईचं 'जू'
उन्हाचं 'जू'
काट्यांचं 'जू'
भाकरीचं 'जू'
भुकेचं 'जू'
दुःखाचं 'जू'
व्यथेचं 'जू'
चटक्यांचं 'जू'
वेदनांचं 'जू'
समस्यांचं 'जू'
दारिद्र्याचं 'जू'....

कुठलं 'जू' उतरवून ठेवायचं अन् कुठल्याचा भार सहन करायचा याची निवड करण्याचा निर्णय त्या वेळेला नियतीने आमच्या हाती ठेवला नव्हता. पण आज तो निर्णय माझ्या हातात आहे. तोच करील आता आमची ह्या 'जू'च्या दास्यातून मुक्तता. जगाच्या दृष्टीने मी फक्त दहावी पास झालो होतो.. किती तरी मुलं पास होतात, तसा मी एक. मात्र, माझ्या दृष्टीने वेगळंच काही घडलं होतं. माझ्या हाती कुठली तरी मशाल लागली होती अन् मी साराच अंधार उचकटून फेकणार होतो. आजपर्यंत पाठीवर स्वार होत गेलेल्या 'जू'चं ओझं मी जाळून टाकणार होतो..

माझं पाटेगाव- माझं घर- माझा मळा- मला सारंच नवं नवं वाटत होतं.. अन् डोळ्यांतही किती तरी सूर्य उगवून आले होते. आईच्या जात्यापाळच्या लोकगीतातल्या चार गावच्या बारवा असलेल्या माझ्या चार बहिणी अन् मधी हिरवा जोंधळा असलेला मी.. पुन्हा उगवून आल्यासारखा.. आई वावरासारखी- आमच्या मुळांचं आळं होणारी!.. तिच्या काळजाची ओलसर माती आम्हा रोपट्यांचं झाड करू पाहणारी.. उलिशा असलेल्या माझ्या झाडाला खूप खूप फांद्या फुटल्या होत्या!

खूप फांद्या फुटणारं उलिसं झाडं म्हणजे 'जू' आत्मकथनातील 'भावड्या'. मी भावड्याचं आत्मकथन लिहिलंय, बाकी काही नाही. कारण माझं बालपण हा माझा भूतकाळ मी समजू शकत नाही. भावड्याने तो वर्तमानकाळ पेलून ठेवलाय. म्हणून तो माझा जगून झालेला काळ, असं मी त्याकडे पाहू शकत नाही. थोडक्यात, मी त्याचा लेखनिक तेवढा होऊ शकलो. भावड्याचीच गोष्ट सांगण्यासाठी



'भावड्याच्या अनुभवांचं' जू मी खांद्यावर घेतलंय. ते मला कितपत पेलवलंय हे माझे वाचक ठरवणारच आहेत. पण तरीही त्या संदर्भात काही सांगणं मला गरजेचं वाटतंय. तेवढं तुमच्यासमोर ठेवण्यासाठी माझा हा शब्दप्रपंच.

प्रथम हेही सांगणं गरजेचं आहे, की साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त कवी ऐश्वर्य पाटेकरचा या आत्मकथनाशी संबंध धरता येत नाही. थोडक्यात, साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त कवीचं कर्तृत्व यात नाही. हे भावड्याचं म्हणणं आहे. तुमच्यासमोर त्याचं जगणं ठेवण्यासाठी त्याने ऐश्वर्य पाटेकरची मदत तेवढी घेतली आहे. ही गोष्ट सर्वस्वी भावड्याचीच होऊन गेलीय. भावड्याची ही गोष्ट मला बिलकूलही लिहायची नव्हती. मला माहीत होतं, की

भाकरीच्या संघर्षात पृथ्वीला गिरकी मारून आलेलं भावड्याचं कुटुंब 'भाकरीच्या चंद्राची दास्तान' मांडतं. भाकरीच्या चंद्राच्या पाठीमागे धावताना जी दमछाक झाली, भावड्याच्या कुटुंबाला कोलमडून पाडण्याचे लाख प्रसंग आले; पण भावड्याची आई ठामपणे उभी होती भावड्या अन् त्याच्या चार बहिणींच्या पाठीमागे. परिस्थितीच्या आसुडाचे मार तिने झेलले पण आपल्या लेकरांना झळ लागू दिली नाही.



**जू**
**ऐश्वर्य पाटकर**
**सकाळ प्रकाशन**
**पृष्ठे : ३८३**
**मूल्य : ३७५ रुपये**

भावड्याचा अनुभवांचा जाळ मला चटका देईल, मला अंतर्बाह्य होरपळून काढील, मला धासरून सोडील. तो जाळ सोसणं माझ्या कुवतीच्या बाहेरचं आहे. भावड्या जे जगला ते विलक्षण होतं. त्याचं माणसांना मातीला भिडत जाणंही. त्याला जरी सक्षम करत गेलो असलो तरी त्याचा अवकाशव्यापी संघर्ष मांडताना मी हरघडी कोलमडलो असतो. म्हणून मी हमेशा पळालो त्याच्यापासून. त्याच्या वाऱ्यालाही मी उभा राहत नव्हतो. दर घटका तो माझा पिच्छा पुरवत होता. त्याच्यापासून तोंड लपवून पळायचं तरी कुठे?

स्वत:पासून पळण्याची तरकीब अजून तरी माणसाला सापडली नाही. मला तरी कशी सापडेल? भावड्याने माझी झोप उडवली. मी जेव्हा कविता लिहायचो तेव्हा तो हटकून कवितेतून येऊ पाहायचा. मी कादंबरी लिहायचो, तर तो मला तिथेही त्याची ओळख दाखवायचा. कथेतूनही त्याचं तोंड दाखविण्यासाठी सरसावलेला असायचा. मी अक्षरश: त्याला शब्दांतून हुसकून द्यायचो. आणि हेही मी प्रकर्षाने जाणून होतो, की भावड्याच्या जगण्यात हात घालणं म्हणजे आग्यामोहोळाच्या पोळात हात घालण्यासारखं आहे. मोहोळाच्या हजारो माश्या भणभणून उठतील अन् जागोजागी डंख करत सुटतील. डंखाची जागा कायमची फुणफुणत राहील. तिचा दाह सहजी शांत होणार नाही. करायचं तर काय करायचं?

बरं, ठरवू या, की भावड्याचं जगणं मांडू या; तर त्याच्या दु:खाची वन-लाइन मांडायला तरी समर्पक प्रतिमा सापडेल का? आणि माझं दुखणं हे आहे, की मी सतत त्याच्यापासून पळालो; मात्र, तो कधीच माझ्यात गैरहजर राहत नाही, राहिला नाही. त्याच्या अस्तित्वाच्या दैनंदिन हजेरीने मी हमेशा अस्वस्थ झालो. भावड्यापासून पळण्याचा मला कुठलाही उपाय सापडला नाही. शेवटी त्याला सामोरं जावंच लागलं. कारण दुष्काळामागून दुष्काळ पचवलेल्या रखरखीत जमिनीत एखादं झाड उगवून यावं तसा तो उगवून आलाय. मी त्याला खुरपू पाह्यलं नाही असं नाही. अनेकदा प्रयत्न केला. त्याच्या मुळांना उखडून टाकू पाह्यलं; पण त्याला पुन्हा अनेक फांद्या फुटून आल्या. त्यांचं काय करायचं? आखरीला माझ्याकडे गत्यंतरच उरलं नाही. म्हणून मी त्याचं आत्मकथन लिहिलं. त्याने ऐश्वर्य पाटेकरला बाजूस सारून स्वत:चा चेहरा धारण केला. भावड्यासमोर आपोआपच ऐश्वर्य पाटेकरचे मानमतराब शून्य होत गेले. सांगा मग, 'जू'ला मी माझं आत्मकथन कसं म्हणणार?

भावड्याचं भलंमोठं आभाळ माझ्या हाताशी लागलं. ते कोणतं? तर त्याच्या चार बहिणी, त्याची खंबीरखूट आई. आणखी संतू, पग्या, झिंग्या, नित्या, गण्या, दिवड्या, सुकड्या यांच्या मैत्रीच्या दौलतीमुळे भावड्या श्रीमंत झालाय. वय वर्षं सोळापर्यंत चिक्कार अनुभव त्याच्या पदरात पडले. भाकरीच्या संघर्षात पृथ्वीला गिरकी मारून आलेलं भावड्याचं कुटुंब 'भाकरीच्या चंद्राची दास्तान' मांडतं. भाकरीच्या चंद्राच्या पाठीमागे धावताना जी दमछाक झाली, भावड्याच्या कुटुंबाला कोलमडून पाडण्याचे लाख प्रसंग आले; पण भावड्याची आई ठामपणे उभी होती भावड्या अन् त्याच्या चार बहिणींच्या पाठीमागे. परिस्थितीच्या आसुडाचे मार तिने झेलले पण आपल्या लेकरांना झळ लागू दिली नाही. भावड्याची ताकदच त्याची आई आहे. पावसात घराचं छप्पर जेव्हा मोडतं, ते अंगावर येऊ पाहतं तेव्हा ती माउली ते छप्पर तिच्या दोन्ही हातांनी पेलून धरते. भावड्या तेव्हा आईचं वर्णन करतो, 'आई घराची मेढ झाली. आई कृष्ण झाली. आई छप्पर झाली!' कृष्णाने गोवर्धन पर्वत आपल्या करगंळीवर उचलला, तशी त्याची आई सगळ्या व्यथांचा, सगळ्या समस्यांचा डोंगर उचलून धरते.

आईच्या संस्कारशाळेत शिकून भावड्या सज्ञान झाला. आईचं वर्णन करताना भावड्या म्हणतो, 'आई काही

चिखलमातीची नव्हती. चिखलामातीनं माखली जरी असली तरी ती हाडामांसाची होती हे कुणालाच कळायचं नाही. एखाद्या माणसाच्या आयुष्यात असंख्य कसोट्या लिहिलेल्या असतात. त्याला त्या द्याव्याच लागतात. त्यातून आईही सुटली नाही. आईनं दिल्या परीक्षांमागून परीक्षा. एकही पेपर अर्धवट सोडून ती उठली नाही. फायनलला फर्स्टक्लास घेऊन पास झाली. ती होतीच तेवढी धीराची. शाळा शिकलेली नसूनही विद्यापीठासारखी. लहानपणी असाच पळत आलो होतो घरी. रडून रडून डोळे मुठीएवढे. आई कामावरून आली अन् म्हणाली,

"कोनी काय केलं माझ्या लेकाला?"

"आई, माला नवा सदरा आणून दे बरं!"

"घेऊ हां नंतर. आता यवढे पैसे हाये कुडं मजजवळ."

"पोरं माला फाटका म्हनतात."

"यवढंच?"

"यवढंच म्हंजे?" मी गालाचा चंबू करत म्हणालो."

"आरे लेका, फाटेलंच म्हनतात, कुनी बाटेल त न्हायी म्हनत नं?"

"न्हायी."

"मग जाव दे, म्हनू दे! आरे, फाटलेला सदरा शिवून घालता येतो पन बाटलं त बाटलंच. त्याला परत टाका घालता येत न्हायी."

निवडक अनुभव भावड्याने कथन केले आहेत. नव्हे, नात्यागोत्याच्या जंजाळाचं वारूळच खोदून समोर ठेवलं आहे. त्याच्या आयुष्यात आलेला 'बाप' हा काही 'जू'चा खलनायक नाही. भावड्याची वाढ संघर्षाच्या वादळाला टकरा देत टणक होत जावी एवढंच कारण. जेवढी काही वाईट माणसं त्याच्या आयुष्यात आलेली आहेत त्यांच्यासाठी भावड्या जगत होता असा नाही. भावड्या आपली स्वतंत्र वाढ घेत जगला आहे.

या आत्मकथनाला नेमकी एक वन-लाइन कुठे आहे? ही कहाणी जेवढी भावड्याची आहे तेवढीच त्याच्या आईची आहे, अन् चारी बहिणींचीही. कहाणी संपते कुठे?

भावड्याच्या एक भाकरीभर आयुष्यातून मांडलेली ही चतकोर भाकरीभर कथा.

●

**ऐश्वर्य पाटेकर**
चलभाष : ७५८८०१६५५९





अनुक्रमणिका











## विश्वस्त मंडळ

अध्यक्ष - **ॲड. भास्करराव आव्हाड**

कार्यकारी विश्वस्त - **शिवाजीराव कदम**

सदस्य - **उल्हासदादा पवार**

## पदाधिकारी व कार्यकारी मंडळ

अध्यक्ष - **डॉ. प्र. चिं. शेजवलकर**

उपाध्यक्ष - **डॉ. द. ता. भोसले, डॉ. रावसाहेब कसबे, चंद्रकांत शेवाळे**

कार्याध्यक्ष - **डॉ. माधवी वैद्य**

प्रमुख कार्यवाह - **प्रकाश पायगुडे**

कोषाध्यक्ष - **सुनील महाजन**

पत्रिका संपादक - **महेंद्र मुंजाळ**

## स्थानिक कार्यवाह

- व्याख्याने व स्मृतिदिन विभाग - **दीपक करंदीकर**
- विशेष पारितोषिके - **डॉ. कल्याणी दिवेकर**
- वार्षिक ग्रंथपारितोषिके - **नंदा सुर्वे**
- परीक्षा विभाग - **सुनीताराजे पवार**
- ग्रंथालय विभाग - **महेंद्र मुंजाळ**
- अतिथीनिवास-वास्तुदेखभाल विभाग - **सुनील महाजन** (प्रभारी)

## पुणे शहर प्रतिनिधी

**डॉ. अरविंद संगमनेरकर । डॉ. सतीश देसाई । प्रा. रुपाली शिंदे**

## जिल्हा प्रतिनिधी

- **डॉ. पुरुषोत्तम काळे** (पुणे जिल्हा)
- **राजन लाखे** (पुणे जिल्हा)
- **डॉ. सु. प्र. कुलकर्णी** (अहमदनगर जिल्हा)
- **प्रा. मेधा काळे** (अहमदनगर जिल्हा)
- **प्रभाकर संत** (ठाणे जिल्हा)
- **पां. के. दातार** (ठाणे जिल्हा)
- **पद्माकर शिरवाडकर** (ठाणे जिल्हा)
- **पद्माकर कुलकर्णी** (सोलापूर जिल्हा)
- **ॲड. जे. जे. कुलकर्णी** (सोलापूर जिल्हा)
- **प्रकाश होळकर** (नाशिक जिल्हा)
- **डॉ. किसन पाटील** (जळगाव जिल्हा)
- **रवींद्र बेडकिहाळ** (सातारा जिल्हा)
- **वृषाली आफळे** (सांगली जिल्हा)
- **राजन मुठाणे** (कोल्हापूर जिल्हा)
- **डॉ. शशिकला पवार** (धुळे-नंदुरबार जिल्हा)
- **प्रतिभा लिमये** (कोकण विभाग)
- **श्याम जोशी** (स्वीकृत सदस्य, ठाणे)
- **उद्धव कानडे** (स्वीकृत सदस्य, पुणे)



अनुक्रमणिका

# मनःपूर्वक अभिनंदन!

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

### नवनिर्वाचित कार्यकारी मंडळ (२०१६-२०२१)

(१ एप्रिल २०१६ पासून)

### • पदाधिकारी •

कार्याध्यक्ष - **प्रा. मिलिंद जोशी**

प्रमुख कार्यवाह - **प्रकाश पायगुडे**

कोषाध्यक्ष - **सुनीताराजे पवार**

### • स्थानिक कार्यवाह •

व्याख्याने व स्मृतिदिन विभाग - **दीपक करंदीकर**

विशेष पारितोषिके - **बंडा जोशी**

वार्षिक ग्रंथपारितोषिके - **उद्धव कानडे**

परीक्षा विभाग - **माधव राजगुरू**

ग्रंथालय विभाग - **वि. दा. पिंगळे**

अतिथीनिवास-वास्तुदेखभाल विभाग - **ॲड. प्रमोद आडकर**

### • पुणे शहर प्रतिनिधी •

**डॉ. अरविंद संगमनेरकर । डॉ. सतीश देसाई । शिरीष चिटणीस**

### • जिल्हा प्रतिनिधी •

- **रावसाहेब पवार** (पुणे जिल्हा)
- **डॉ. पुरुषोत्तम काळे** (पुणे जिल्हा)
- **राजन लाखे** (पुणे जिल्हा)
- **चंद्रकांत पालवे** (अहमदनगर जिल्हा)
- **जयंत येलूलकर** (अहमदनगर जिल्हा)
- **प्रभाकर संत** (ठाणे जिल्हा)
- **पद्माकर शिरवाडकर** (ठाणे जिल्हा)
- **सुरेश देशपांडे** (ठाणे जिल्हा)
- **पद्माकर कुलकर्णी** (सोलापूर जिल्हा)
- **ॲड. जे. जे. कुलकर्णी** (सोलापूर जिल्हा)
- **कल्याण शिंदे** (सोलापूर जिल्हा)
- **प्रकाश होळकर** (नाशिक जिल्हा)
- **नितीन ठाकरे** (नाशिक जिल्हा)
- **प्रा. तानसेन जगताप** (जळगाव जिल्हा)
- **रवींद्र बेडकिहाळ** (सातारा जिल्हा)
- **विनोद कुलकर्णी** (सातारा जिल्हा)
- **सोपानराव चव्हाण** (सातारा जिल्हा)
- **दशरथ पाटील** (सांगली जिल्हा)
- **राजन मुठाणे** (कोल्हापूर जिल्हा)
- **डॉ. शशिकला पवार** (धुळे-नंदुरबार जिल्हा)
- **प्रकाश देशपांडे** (कोकण विभाग)

अनुक्रमणिका

बुक-पोस्ट


प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : March 2016
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category




